


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






# दीपावली

वर्ष १५ वे
मूल्य १। रु.

अभिनव महाराष्ट्र विशेषांक

अनुक्रमणिका



# दीपावली

**साहित्य - कला - संगम**

अभिनव
महाराष्ट्र
विशेषांक

## श्रेयनामावलि




वर्ष १५ वें
ऑगस्ट १९५९

**दीपावली**—मासिक दर महिन्याच्या एक तारखेस प्रसिद्ध होतें.
संपादक-मुद्रक-प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल.** दलाल आर्ट स्टुडियो ४०–४२ केनेडी ब्रि मुंबई नं. ४. प्रत्येक प्रतीस किंमत रु. १. अधिक रजिस्टर पोस्ट ५० नये पैसे. वार्षिक वर्गण दिवाळी अंकासह रु. १२. या अंकांत प्रसिद्ध झालेली मतें चालकांची अधिकृत मतें असतात असें नाहीं. या मासिकांतील प्रकाशित चित्रें व लेख यांवरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन




अनुक्रमणिका



विनोबा भावे, ( १९३२, धुळें जेल )

१९२३ च्या जानेवारी महिन्यांत विनोबा भावे यांच्या संपादनाखालीं महाराष्ट्रधर्म या मासिकाचा पहिला अंक प्रसिद्ध झाला. भूदानाच्या चळवळीच्या कार्याला वाहून घेतलेल्या विनोबांचें महाराष्ट्र प्रेम आणि त्यांचा व्यापक दृष्टिकोन या संपादकीय निवेदनांत स्पष्टपणें प्रतीत होतो.

# मराठा तितुका मेळवावा

महाराष्ट्र-धर्म जानेवारी १९५३. वर्ष १ लें अंक १ ला. निवेदनांत संपादक ( विनोबा ) लिहितातः ]

......'महाराष्ट्र-धर्म' हें नांव मासिकासाठीं सुचविण्यांत नंतर मित्रमंडळाच्या खासगी चर्चेंत त्यावर बरेच आक्षेप त आले. त्यांतील मुख्य अर्थात् असा होता कीं, भारतीय रांचा प्रवाह प्रांतीय भावनांची कोंडी फोडून अति-प्रांतीय, ना अति राष्ट्रीय, वळणानें वाहूं लागला असतां, 'विश्व-भारती' ी उदार, वैश्वानर कल्पना शोधून काढण्याऐवजीं 'महाराष्ट्र-धर्म' आत्मसंकोची नांव धारण करणें बरें नव्हे. पण हा आक्षेप वरून गोड तसाच आंतून पोकळ आहे. एक तर 'महाराष्ट्र' हा रूढ अर्थानें विशिष्ट प्रांताशीं जोडला गेला असला तरी त्यामुळें ारा संकुचितपणा 'धर्म' या उदार शब्दाच्या सहवासानें ा होईल—कारण, संकुचितवृत्ति हा धर्म होऊं शकणार नाहीं. दुसरें असें कीं, खालचे खालचे धर्म वरच्या वरच्या धर्मांना न करतां राहतील तर ते कोणत्याहि प्रकारें हानिकारक न होतां रकच होतील. मर्यादित क्षेत्रामुळें जोरकसपणा हा गुण आणि तपणा हा दोष उत्पन्न होऊं शकतो. अशा स्थितींत दोष गुण घेतां आल्यास तसें करणें इष्टच होईल. शिवाय 'महाराष्ट्र' द रूढ अर्थानें मर्यादित असला तरी व्युत्पत्तीच्या दृष्टीनें व्यापक ाकेल. रूढ अर्थानें 'महाराष्ट्र' म्हणजे एक प्रांत असा अर्थ , शिवाय त्याच शब्दानें एक 'महान् राष्ट्र' म्हणून सबंध नचा बोध होऊं शकेल, आणि 'राष्ट्र-संघ' अशा अर्थानें भारती' इतकाच व्यापक अर्थहि निघूं शकेल. तेव्हां आमच्या प्रांताचा विशिष्ट महाराष्ट्र धर्म, देशाचा सामान्य महाराष्ट्र-धर्म, आणि जगाचा सार्वभौम महाराष्ट्र-धर्म अशा तिहेरी अर्थानें हा शब्द येथें योजिलेला आहे. महाराष्ट्र-धर्म ही संज्ञा मूळ समर्थांच्या ग्रंथांतून घेतलेली आहे. तरी त्या संज्ञेचा कोणी अधिक व्यापक अर्थ घेतल्यास त्यास समर्थांची काय किंवा कोणाची काय कांहींच हरकत असूं शकणार नाहीं. इतकेंच काय पण महाराष्ट्राची ऐतिहासिक परंपरा पाहिल्यास मूळ योजकाच्या मनांतहि हा अर्थ नसेलच असें म्हणण्याचा हट्ट कोणी करणार नाहीं, कोणी करूं नये. **महाराष्ट्राच्या परंपरेला शिवरायाचा अभिमान तर सोडतां येणारच नाहीं.** समर्थांच्या वचनांचा अर्थ शिवरायांना जितका समजला असेल तितका इतर कोणास समजला असेल असें मानण्यास पुरावा नाहीं. 'मराठा तितुका मेळवावा' हें महाराष्ट्र-धर्माचें सूत्रवाक्य आहे. त्याचा अर्थ इतर सगळे वगळावे असा त्यांच्या मनांत तरी दिसत नाहीं. त्यांचा प्रयत्न मराठी साम्राज्य स्थापण्याचा नसून, 'हिंदवी-स्वराज्य' स्थापण्याचा होता असें त्यांनींच म्हटलें आहे. त्यांना स्वधर्माविषयीं प्रेम असलें तरी परधर्माविषयीं द्वेष नव्हता. कारण मक्केच्या यात्रेकरूंविषयीं त्यांना अतिशय आदर वाटत असल्यामुळें अशा धार्मिक यात्रेकरूंना त्रास न देण्याबद्दल त्यांनीं सैनिकांना सक्त ताकीद दिली होती, इतकेंच काय पण त्यांच्या खुद्द आरमारावर मुसलमान अधिकारी काम करीत होते. भूखन या हिंदी कवीला त्यांच्या दरबारीं राजकवीचा मान मिळाला होता. ह्यावरून स्वदेश, स्वधर्म आणि स्वभाषा ह्याविषयीं त्यांच्या कल्पना किती उदार होत्या हें स्पष्ट दिसून येतें. ह्या सर्व परंपरेचा नीट विचार केल्यास 'महाराष्ट्र-धर्म' हा प्रथमदर्शनीं जरी वामनासारखा दिसला तरी वस्तुतः तो दोन्ही पावलांतच विराट् विश्व व्यापून टाकणाऱ्या त्रिविक्रमासारखा आहे असें दिसून येईल. ह्या त्रिविक्रमाचें एक पाऊल महाराष्ट्रीय, दुसरें राष्ट्रीय आणि तिसरें अति–राष्ट्रीय आहे. यशोदेचा बाळकृष्ण एका अर्थानें विश्वरूपाच्या मुखांत असला तरी दुसऱ्या अर्थानें त्याच्याहि मुखांत विश्वरूप येतें हा अनुभव जसा यशोदेच्या यशस्वी दृष्टीला आला, त्याचप्रमाणें 'महाराष्ट्र–धर्म' हा आकुंचित अर्थानें भारतीय धर्माच्या एका कोपऱ्यांत पडल्यासारखा असला, तरी व्यापक अर्थानें संबंध भारतीय धर्माला पोटांत घालून 'दहा अंगुळें' वर उचलण्यासारखा आहे असेंच ऐतिहासिक प्रज्ञेच्या विचारी दृष्टीस दिसून येईल."

• • •

अनुक्रमणिका



भारतीय संस्कृतीचीं प्रतीकें : ६

भगवान् श्रीकृष्ण

पूंजीभूतं प्रेम गोपाङ्गनानां
मूर्तीभूतं भागधेयं यदूनाम
एकीभूत गुप्तवित्तं श्रुतीनां
श्यामीभूतं ब्रह्म मे सन्निधत्ताम्

— राघव चैतन्य

गोपिकांचें हे प्रेम पुंजीभूत
यदूवंशाचे भाग्य मूर्तीमंत
श्रुती गोपायित वित्त एक बाहे
श्यामरूपें हे ब्रह्म नांदताहे

— राजा बढे









अनुक्रमणिका

दीपावली

आषाढ शके १८८१ ऑगस्ट १९५९



# शिवाजी उत्सव

— रविंद्रनाथ टागोर —

कवण दूर शतकाच्या कवण्या अश्रुत दिवशीं केव्हां नाहिं ठाउकें आज
कवण मराठी शैलि बैसलां कानन–घन–अंधारीं प्रभु तुम्ही शिवराज
तडित्प्रभावत् एक भावना उजळित तुमच्या भाळा स्थिरावली हृदयांत
'छिन्न विखंडित क्षिप्त भारता सांधिन बांधिन एका धर्म राज्य पाशांत'

निद्रावश या वंगभूमिला जाग न आली तेव्हां ऐकुं न आला साद
उठुनि धांवली नाहिं अंगणीं तसाच नुठला किंवा शुभ शंखाचा नाद
कोमल श्यामल विमल ओढणी सुखें घेउनी अंकीं गाढ झोपली शांत
संध्यासमयीं धरुनी हृदयीं अपुल्या शतसंताना निज तंद्रेत निवांत

तुमच्या वज्र शिखेनें लिहिल्या त्यानंतर दिनिं एका उभ्या महाराष्ट्रांत
दिगंतरांतुन युगान्तराचा विद्युत् वन्हि कळेचा महामंत्र विक्रांत
प्रलयघडिस त्या पेट मोडली मोगल-शिरपेचाची जसें गळावें पान
तरिहि न झालें वंगभूमिला महाराष्ट्र–घोषाच्या संदेशाचें भान

भीषण रातीं झंझावातीं दिल्लि राजशालेचा आला अन्त समीप
एका मागुन एक महालीं चढल्या अंधःकारीं विझूं लागले दीप
मोगल महिम्याभंवतीं जमले करित घोर चीत्कारा शवास टपले गीध
राख मूठभर मात्र राहिली त्या मोगल महिम्याची इतिहासांत प्रसिद्ध

त्या दिवशीं या वंगप्रदेशीं नव वणिकांच्या हाटीं वाजुं न देतां पाय
वणिकलक्ष्मीचें ये सिंहासन गहन चोरवाटेनें होउनि गोगलगाय
मूकपणानें वंगभूमिनें अपुल्या गांगजळानें केला त्या अभिषेक
उजाडतांक्षणिं राजदंड हो तागडीच्या दांडीचा अशी तयांची मेख

द्रष्टया, स्रष्टया, वीर मराठ्या होतां तेव्हां कोठें कोटें तुमचें नाम
भगवा झेंडा धुळींत कुठेंतरि मिळून गेला होता होउनि हतपरिणाम
दस्यु म्हणुन इतिहास विदेशी हांसुनि अट्टहासानें करि तुमचा उपहास
सर्व योजना विफल गणी तो खटाटोप पुंडाचा तुमचा पुण्य प्रताप

असत्यभाषी हे इतिहासा! बडबड व्यर्थ कशाला धरि कांहीं तरि लाज
कुटिल लेखनावरती तुझिया जय आहे व्हायाचा विधिलेखाचा आज
जें मरणारें नसे कधींही तुझ्या व्यंगवाणीनें केवीं सांग दबेल
सत्य तपस्ये तुमच्या न कधीं त्रिभुवनांतही बाधा श्रद्धा मम निर्भेळ

राजतपस्वी वीरा तुमची उदात्त श्रद्धाभक्ती संचित विधिकोषांत
काळ हिरावुन घेइल कैसा अंशहि एक तियेचा सदैव जी दुर्दान्त
स्वप्राणांजलि देशलक्ष्मीच्या स्वराज्य-पूजागारीं सत्यसाधना आज
कुणास होतें ठाऊक होइल दिव्य अनंत युगांचा भारतवैभव साज

दीर्घकाल राहिलां तुम्ही जे अहो राजवैरागी अश्रुत अन् अज्ञात
आज प्रगटलां शैल विदारुन अपुल्या पूर्णबळानें जणुं वर्षेंत प्रपात
झळकत आहे फडकत आहे तुमचा भगवा झेंडा व्यापुनि हें आकाश
मुकाट मिटला कसा राहिला इतुके दिवस निरान्ती विस्मय लोक-मनास

अपूर्व मी हें पाहत आहें कवि भारतपूर्वेचा उदंड पावुनि हर्ष
आज कुडनि नव जयभेरीचा वंग अंगण-द्वारीं नवाच हा उत्कर्ष
क्षणांत भेदुन गाढ भयानक तमिस्त्र तीन शतांचा तुमचा पुण्य प्रताप,
पूर्व दिशेला फुलवित येतो अभिनव निज किरणांनीं नवयुगस्तोत्रालाप



अनुक्रमणिका

न मरे, न मरे, सत्य असे जें कधिंही शत शतकांच्या
विस्मृति–अंधारांत
न मरे कधिंही उपक्षेंत वा न चळे अपमानानें
ढळे न आघातांत
सान्त मानिलें, लुप्त मानिलें, गणिलें जें सर्वांनीं
सदाकाळ निःशेष
सत्य तेंच ये घेऊनि तुमचा भरतभूमिच्या द्वारीं
मंगळ अतिथी-वेष

मंत्र तयाचा तोच बाहतो—पाहति तेच भविष्या
नेत्र विलोल विशाळ
महान बघती दृश्य कोणतें लावुनिया टक तेथें
फेकित द्युतिचे ढाळ
लेवुनिया अशरीर तापसा ! केवळ निज तपमूर्ती
तुम्ही प्रगटलां आज
तेंच पुण्य सामर्थ्य प्रकाशित पुनश्च येथें आलां
उजळित तें शुभ काज

आज नसे ध्वज, आज न सेना, रणदळ ना अश्वांचें
वा शस्त्रास्त्र कराल
आज न वाजे, आज न गाजे, गगना कांपविणारा
'हरहर' घोष विशाळ
आज फक्त तव नाम महत्तम त्यजुनि लोक पितरांचा
येइ देत आव्हान
हृदयासनिं तुज वरिती स्वामी ! मंगळ याच मुहूर्ता
वंग सुतांचे प्राण

कधिं न वाटलें जनीं कुणाला गत शतकीं या तीन्ही
चुकूनही स्वप्नांत
रणावीण तव नाम महत्तम महाराष्ट्र–बंगाला
एक करील क्षणांत
तपस्तेज तव दीर्घकाळ जें जगीं अगोचर होतें
अवचित हो साक्षात
अमरवाणिरूपानें प्रेरित नव्या अनश्वर प्राणा
देत नवीन प्रभात

धर्मराज ! तुम्हि सीमेवरुनी जधीं महाराष्ट्राच्या
रौद्र घातली हांक
राजा नच जाणिलें मानिलें धरिल्या नाहीं लाजा
मात्र घेतला धाक
विजेसारखें खड्ग तळपलें तुमचें वंगाकाशीं
जेव्हां दिवशीं एक
ओळखला नच घोर दिनीं त्या मिळून रुद्रकळेचा
तुमचा विद्युल्लेख

अमर मूर्ति होऊन बैसलां सिंहासनिं मृत्यूच्या
तुम्ही समुन्नत–भाळ
नाहीं कधिंही लपावयाची दिव्य ज्योति मुकुटाची
जरी भागला काळ

ओळखिलें तुम्हां हे राजन्, ओळखिलें तुम्हांला
तुम्हि भूपाधिपराज
मंगळ तव करभार घेउनी आठ कोट बंगाली
पुढें ठाकलें आज

धरूं मस्तकीं भैरवरव जो कदा ऐकिला नाहीं
तुमचा दिव्यादेश
कंठ जुळवुनी वक्ष भिडवुनी मिळतिल तुमच्या मंत्री
सर्व हिंदवी देश
संन्याश्याच्या छ.टीचा ध्वज होईल संतत आम्हां
अकिंचनातें त्राण
'धर्मराज्य हो एक हिंद हा' या तव महद्वचाचा
करुं मृत्युंजय बाण



वंगसुतांनो सुरांत बोला मराठियांच्या संगें
'जय जय जय शिवराज'
मराठ्यांसवें चाला सगळे नव जागृत बंगाली
शिवमहोत्सवा आज
सभेंत एका जुळूं मिळूं द्या भारत पश्चिमपूर्वा
दक्षिण आणिक वाम
एकसाथ एकत्र भोग द्या, गौरवांत व्हा साथी
घोषित पावन नाम

अनुवादक :—बा. भ. बोरकर



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका







१९१९ सालीं गडकऱ्यांचें निधन झालें. पण त्यानंतर मराठी वाङ्मयाला विलक्षण असा बहर आला. वाङ्मयाच्या विविध दालनांत चतुररत्न लेखक प्रवेश करते झाले. काव्य, नाट्य, कादंबरी इत्यादि क्षेत्रांत भरगच्च असें साहित्य निर्माण झालें. त्यानंतर दुसऱ्या महायुद्धानंतर मराठी वाङ्मयाला एक वेगळी कलाटणी मिळाली. १९४७ पासून मराठी वाङ्मय एक प्रकारें अंतर्मुख झालें.— गडकरी ते माधव ज्यूलियन आणि माधव ज्यूलियन ते मर्ढेकर या विस्तृत कालखंडाचा महाराष्ट्राचे थोर कादंबरीकार आणि रसज्ञ समीक्षक श्री. वि. स. खांडेकर यांनीं घेतलेला हा आढावा--



# गडकऱ्यांनंतरचें ललितसाहित्य

— वि. स. खांडेकर

जीवनाप्रमाणें वाङ्मयाचेंहि सिंहावलोकन करण्यांत विविध प्रकारचा आनंद असतो. पिढीपिढीला अभिरुचि कशी बदलते, सामाजिक घडामोडींचे परिणाम साहित्यावर कसे होतात, लोकप्रियतेच्या शिखरावर उभीं असलेलीं ग्रंथांची आणि ग्रंथकारांचीं नांवें कांहीं काळानें विस्मृतीच्या दरींत कशीं लुप्त होतात, आणि दीर्घकाळ लोकप्रिय राहणाऱ्या साहित्यांत अक्षरवाङ्मयाच्या पढिक कल्पनांनी गौरवलेल्या गुणांपेक्षा कोणते निराळे गुण आढळतात, इत्यादि गोष्टींचें अशा वाङ्मयीन सिंहावलोकनांत मोठें मजेदार दर्शन घडतें. वळणावळणाने वाहात जाणाऱ्या नदीच्या कांठाने स्वच्छंद सहल करण्यांत जो आनंद असतो, तोच साहित्याच्या अशा सिंहावलोकनांतहि लाभतो.

या दृष्टीनें गेल्या तीन तपांतल्या साहित्याकडे पाहिलें तर मराठी ललितवाङ्मयाने घेतलेली दोन मोठीं वळणें नजरेंत भरतात. १९१९ ते १९३९ व १९३९ ते १९५६ असे या कालखंडाचे दोन भाग पाडणें अनेक दृष्टींनी इष्ट आहे. १९३९ मध्यें रविकिरण-मंडळाचे एक प्रमुख कवि माधव ज्यूलियन यांचें निधन झालें. १९१९ सालीं झालेल्या गोविंदाग्रजांच्या मृत्यूनंतर ललित वाङ्मयाने घेतलेलें नवें वळण यावेळीं जुनें होऊन गेलें होतें. याच वर्षी दुसरें महायुद्ध सुरू झालें. या महायुद्धाचे आर्थिक व सामाजिक परिणाम फार मोठे झाले. विशेषतः साहित्य निर्माण करणाऱ्या आपल्या मध्यमवर्गाचें जीवन तर या महायुद्धानें अंतर्बाह्य बदलून टाकलें. या स्थित्यंतराची प्रतिक्रिया ज्यांच्या लेखनांत प्रथमच तीव्रतेनें दिसून आली, ते मर्ढेकर १९५६ सालीं दिवंगत झाले. समुद्राच्या भरतीची सीमा ही जशी ओहोटीची सुरवात असते, तसा एका वाङ्मयीन रीतीचा किंवा प्रवृत्तीचा पूर्ण आविष्कार झाला, की ती मागे पडून दुसऱ्या रीतीचा किंवा प्रवृत्तीचा उदय होऊं लागतो. नवकथा, नवकाव्य वगैरे नांवांनी सूचित होणाऱ्या वाङ्मयीन प्रवृत्तींची गेल्या तीन वर्षांत जी डोळस चिकित्सा होऊं लागली आहे, ती लक्षांत घेतली म्हणजे मराठी ललित वाङ्मय पुन्हा नव्या वळणापाशीं येऊन थबकलें आहे, हें स्पष्ट दिसतें.

अशा वेळीं गेल्या दोन-तीन तपांत आपल्या ललित साहित्यानें नवें काय मिळविलें, आणि जुनें काय गमावलें याचा ऐतिहासिक दृष्टीनें विचार करणें आवश्यक आहे. तो करूं लागलें की आरंभींच एक गोष्ट लक्षांत येते. ती म्हणजे १९१९ ते १९३९ या कालखंडाला सामान्यांचा कालखंड म्हणण्याची पडलेली पद्धत. या पद्धतींत शास्त्रापेक्षा रूढीचाच भाग अधिक आहे! कुसुमावती देशपांड्यांनी रविकिरण-मंडळाच्या काव्याची चिकित्सा करतांना तें सामान्यांचें काव्य आहे, अशा अर्थाचे एकदा उद्गार काढले. या उद्गारांची सत्यासत्यता पारखण्याचें काम कुणींच कसोशीनें केलें नाहीं. उलट, कुणाची रसिकता फार उच्च श्रेणीची म्हणून, याची ना त्याची टोपी उडवली म्हणजे टीकाकार होता येतें असें कुणाला वाटलें म्हणून, कोऱ्या करकरीत पाश्चात्य वाङ्मयानें आणि त्यांतील टीकामूल्यांनी कुणी दिपून गेले म्हणून, असें कांहीं लिहिलें म्हणजे पांडित्याचें पद्धतशीर प्रदर्शन होतें असें कित्येकांना अनुभवाने पटलें म्हणून, नाना गटांतली आणि गोटांतली मंडळी या कालखंडाला सामान्यांचा कालखंड म्हणून संबोधूं लागली.

पण साहित्य गुणांच्या दृष्टीनें खरोखर हा कालखंड सामान्यांचा होता काय? तांबे, वरेरकर, वा. म. जोशी, डॉ. केतकर, चिं. वि. जोशी, फडके, माधव ज्यूलियन, पु. य. देशपांडे, अत्रे, यशवंत, माडखोलकर, साने गुरुजी, य. गो. जोशी, अनिल, काणेकर, विभावरी शिरूरकर यांचें ऐन उमेदींतलें सर्व कर्तृत्व याच काळांत घडलेलें आहे. या सर्वांच्या साहित्यावर 'सामान्य' हा सवंग शेरा मारणें सोपें आहे. पण तो शेरा मारणारांनी पुढील प्रश्नांचीं उत्तरे प्रामाणिकपणानें शोधणें जरूर आहे. या कालखंडांत मराठी शैलीचा विकास झाला नाहीं काय? हरिभाऊ व केळकर यांच्यासारखे प्रसन्न शैलीचे लेखक १९२० पूर्वी झाले असूनहि मराठी ललित शैलीला नव्या काळाला अनुरूप असें स्वरूप प्राप्त झालें नव्हतें. या शैलीवर पांडित्याची व त्यामुळें

येणाऱ्या अवजडपणाची–प्रसंगीं रुक्षतेचीसुद्धां दाट छाया तरंगत होती. पण हरिभाऊ–केळकरांची शैलीची प्रसन्नता कायम ठेवून तिला माधुर्याची, लवचिकपणाची आणि विविध सौंदर्याचा सहजतेनें आविष्कार करण्याच्या शक्तीची जोड फडके, अत्रे, साने गुरुजी, काणेकर, विभावरी शिरूरकर प्रभृति लेखकांनी दिली नाहीं काय ? भरतीच्या वेळीं किनाऱ्यालगतचे खडक जसे पाण्याखालीं जाऊन दिसेनासे होतात, तसे हरिभाऊंच्या कादंबरी–लेखनांतले दोष त्यांच्या प्रतिभेच्या आणि जिव्हाळ्याच्या प्रकाशांत उजळून निघाले आहेत. पण १९२० पूर्वीच्या इतर लेखकांच्या कादंबऱ्या पाहिल्या म्हणजे त्या दोषांची पूर्ण कल्पना येते. त्या काळांतल्या कितीशा कादंबऱ्या आतां वाचनीय वाटतात ? अशा स्थितींत ज्या फडक्यांनी कादंबरीला नवें नीटनेटकें रूप दिलें, आणि ज्या लेखकांनी कादंबरीच्या कक्षा वाढवून तत्त्वचिंतनापासून काव्यविलासापर्यंत आणि राजकारणापासून समाजशास्त्रापर्यंत तिचा संचार घडवून आणला, त्यांना 'सामान्य' लेखणें हा जसा वाङ्मयाच्या शुद्ध रसास्वादाचा मार्ग नव्हे, तसा ऐतिहासिक दृष्टीनें वाङ्मयाचें मूल्यमापन करण्याचाहि तो मार्ग नव्हे ! हा इतिहास होत नाहीं; तें इतिहासाचें विडंबन होतें.

कोणत्याहि कालखंडांतील वाङ्मय-निर्मितीचें मूल्यमापन करतांना विविध लेखकांच्या प्रतिभांची स्वरूपें, त्या काळांतील विशिष्ट परिस्थिति आणि त्या काळच्या वाचक वर्गाच्या आवडीनिवडी व आशा–आकांक्षा या सर्वांचा विचार करणें आवश्यक असतें. प्रत्येक लेखकाची शक्ति हीच शेवटीं त्याची मर्यादा ठरते, या सूत्राचाहि समीक्षकानें स्वतःला विसर पडूं देतां कामा नये. लेखकाची प्रतिभा प्रफुल्लित किंवा प्रज्वलित करण्यांत काळाचाहि कांहीं भाग असतो. तो नाकारून चालणार नाहीं. इतकेंच नव्हे तर त्याच्या विशिष्ट वाचक वर्गाच्या आवडी निवडी, आशा आकांक्षा, सुखें दुःखें यांच्यामुळेंहि लेखकाच्या निर्मितीचें स्वरूप अंशतः निश्चित होतें. हरिभाऊंसारख्या अपार कणवेच्या आणि असामान्य प्रतिभेच्या साहित्यिकानें अस्पृष्ट दलित आणि वंचित अशा बहुजन समाजाच्या कुठल्याहि भागाला एकादि कादंबरींत, आपला संजीवक स्पर्श करूं नये, याचें काळ आणि वाचकवर्ग यांच्याखेरीज दुसरें कोणतें कारण सांगतां येईल ?

१९१९–२० सालीं मराठी ललितवाङ्मयाच्या गाडीनें आपले रूळ बदलले. सामर्थ्याच्या उपासनेकडून तें सौंदर्याच्या उपासनेकडे वळण्याचा प्रयत्न करूं लागलें. निबंध, नाटक व कादंबरी हे ध्येयवादाला अधिक अवसर देणारे वाङ्मयप्रकार थोडेसे मागे पडले, त्यांची जागा लघुकथा, लघुनिबंध, शब्दचित्र, नाट्यछटा, वगैरे सूचक व तत्त्वप्रतिपादनापेक्षां कलाविकासाला पोषक अशा वाङ्मयप्रकारांनी घेतली.

असें होण्याचीं कारणें अनेक होतीं. १९२० पूर्वीच्या मध्यमवर्गाच्या मनाची बैठक मुख्यतः लढाऊ होती. आतां त्याच वर्गांतून एक सुशिक्षित, सुखवस्तु असा वर्ग निर्माण झाला होता. या काळांतले अनेक लेखक याच वर्गांतले होते–निदान त्याच्या आसपास वावरत होते, त्याच्याशीं सहज समरस होत होते. मागच्या दोन पिढ्यांना स्फूर्ति देणारीं इंग्रजी साहित्यांतलीं दैवतेंहि या वेळीं बदललीं. त्यांची जागा नव्या दैवतांनीं घेतली. शिवाय कलेचें मूल्य स्वतंत्र आहे, ती नीतिनिरपेक्ष, ध्येयनिरपेक्ष, अशी वस्तु आहे, हा विचार वळावण्याला अतिशय अनुकूल अशी परिस्थिति अनेक कारणांनी निर्माण झाली. 'जादूगार कादंबरी लिहितांना अमुक एक विषय प्रतिपाद्य म्हणून मी कांहीं योजला नव्हता.' हे फडक्यांचे उद्गार या संदर्भांत महत्त्वाचे आहेत.

१८८० ते १९२० या कालखंडांत मराठी मन ध्येयवादाच्या कल्पनांनीं सतत पेटत, जळत राहिलें होतें. त्या तीव्रतेच्या मागे असलेल्या भावनांची प्रतिक्रिया म्हणून तें पुढें चिकित्सेकडे वळूं लागलें; उत्कटतेपेक्षां समतोलपणा आणि संश्लेषणापेक्षा विश्लेषण यांत तें रमूं लागलें. न. चिं. केळकर, वा. म. जोशी व डॉ. केतकर हीं या संक्रमणाची ठळक उदाहरणें आहेत. नेमकें याच सुमारास राजकारणांतलें नेतृत्व महाराष्ट्राबाहेर गेलें. ब्राम्हण–ब्राह्मणेतर वादानें समाजकारणांतल्या ध्येयवादाला नानाप्रकारचे फांटे फुटले. गांधीजी देशाचे नवे नेते झाले होते. त्यांचें तत्त्वज्ञान केवळ तर्काच्या, बुद्धिवादाच्या किंवा सुवर्णमध्याच्या कसोटीवर घासून पचनीं पडण्याजोगें नव्हतें. साहजिकच बुद्धिवादी म्हणवून घेणाऱ्या मध्यमवर्गीय मराठी मनाची वृत्ति या नव्या ध्येयवादाविषयीं साशंक झाली.

दुसरी गोष्ट म्हणजे १९२० नंतरचें मराठी मन हें आगरकर किंवा सावरकर यांच्या पिढ्यांतल्या मनासारखें वैचारिक दृष्टीनं एकाग्र, एकसंध राहिलें नाहीं. रशियांतली राज्यक्रांति, सत्यशोधक समाजाची चळवळ, गांधी, मार्क्स व फ्रॉइड यांचीं परस्परविरुद्ध तत्त्वज्ञानें या व अशा प्रकारच्या अनेक गोष्टींनीं मराठी लेखकांच्या भावनात्मक जगांत गोंधळ निर्माण झाला. त्यामुळें प्रतिभेच्या प्रस्फुरणापेक्षां बुद्धि, तर्क, तंत्र इत्यादिकांचा अधिक प्रमाणांत अवलंब करणें अनेक कलाकारांना सोईस्कर वाटूं लागलें.

तिसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे इंग्रजी वाङ्मयाचा वेगानें वाढणारा परिचय. या परिचयामुळें नव्या नव्या पाश्चात्य वाङ्मयप्रकारांविषयीं तरुण कलावंतांच्यांच्या मनांत कुतूहल निर्माण, होणें स्वाभाविक होतें. ते सर्व वाङ्मयप्रकार मराठींत रूढ करण्याच्या नादांत ते निमग्न झाले. १९२० ते १९३५ हा काल निबंध आणि नाटक यापेक्षां लघुकथा, लघुनिबंध, शब्दचित्र, नाट्यछटा इत्यादिकांनीच गाजविला. याचा अर्थ उघड आहे. या कालखंडांतल्या साहित्याचें कार्य विकासापेक्षा विस्ताराचें होतें. विषय, शैली, तंत्र, रचना, इत्यादि बाबतींत या काळांत झालेली प्रगति लक्षांत घेतली म्हणजे हा कालखंड सामान्यांचा होता असें म्हणणाऱ्यांचें मोठें नवल वाटतें. नवी क्षेत्रे पादाक्रांत करणें निराळें व तीं नांगरून पिकविणें निराळें ! तीं पिकविणारांचें मोठेंपण कुणीच अमान्य करूं नये. पण तीं पादाक्रांत करायला अंगीं पराक्रम असावा लागतो, हें त्यांच्या विरोधकांनीहि विसरूं नये.

१९२० पूर्वीच्या कालखंडांतली किर्लोस्कर, देवल, हरिभाऊ, केशवसुत, गोविन्दाग्रज, बालकवि, खाडिलकर, श्रीपाद कृष्ण, शिवरामपंत परांजपे, अशीं हाताच्या बोटांवर मोजतां येण्याजोगीं नांवें सोडलीं तर 'असामान्य' असें विशेषण लावण्याजोगीं कितीशीं नांवें आपल्याला सांपडतात ? त्या कालखंडाभोवतीं ध्येयवादाचें उज्वल वलय तळपत होतें. त्याचा

अनुक्रमणिका

प्रकाश परावर्तित होऊन तो अनेक सामान्य लेखकांच्या वांट्यालाहि आला. त्यामुळें तो काळ असामान्याचा आहे असा भास निर्माण झाला. सूर्य मावळला तरी त्याचा प्रकाश जसा मागें रेंगाळत राहतो, त्याप्रमाणे ध्येयवादानें उजळलेल्या त्या कालखंडांतल्या वाङ्मयाची उज्ज्वल स्मृति अजूनहि महाराष्ट्राच्या मनांत तरंगत आहे—आजहि त्यानें केलेल्या लोकजागृतीचें कृतज्ञतेने स्मरण केलें जात आहे. केशवसुत, बालकवि यांच्या जोडीनें विनायकांचें नांव अजून घेतलें जातें तें यामुळेंच !

पण केवळ साहित्यगुणांच्या दृष्टीनें पाहिलें तर नंतरच्या पिढींतल्या लेखकांना ज्यांची उंची गांठता आली नाहीं, अशीं शिखरें या १९२० पूर्वीच्या काळांत कितीशीं आहेत ? हरिभाऊंची उज्ज्वल आणि समतोल प्रतिभा गडकऱ्यांची उत्कट पण उच्छृंखल कल्पकता, केशवसुतांची ज्ञाताच्या कुंपणावरून पलीकडे जाण्याची धडपड करणारी अंतर्मुख काव्यात्मता, यांच्याशीं तुल्यबल असें नंतरच्या कालखंडांत कांहीं दाखवितां येणार नाहीं ही तक्रार निराधार नाहीं. पण हरिभाऊ, गडकरी आणि केशवसुत यांच्यासारखे साहित्यिक प्रत्येक पिढीला जन्माला येत नाहींत, हेंहि त्याचबरोबर लक्षांत घ्यायला नको काय ?

हें लक्षांत घेऊन १९१९–१९३९ या कालखंडांतल्या वाङ्मयाकडे पाहूं लागलें, म्हणजे त्याने, पुढील काळांतल्या प्रवासाची शिदोरी म्हणून, मराठी मनाला काय काय दिलें याची नीट कल्पना येते. यमुनेपासून (पण लक्ष्यांत कोण घेतो ?) पद्मेपर्यंत (मायेचा बाजर) हरिभाऊ स्त्रीच्या दुःखाची आणि आणि दास्याची करुण कहाणी सांगत होते. तें कारुण्य पुढील कालखंडांतहि कायम राहिलें. पण या नव्या कालखंडांतली स्त्री अगतिक राहिली नाहीं. बंडखोरपणाचीं बीजें तिच्या मनांत रुजूं लागलीं–फुलूं लागलीं. निर्मलेपासून (दौलत) अचलेपर्यंतच्या (हिंदोळ्यावर) नायिका या दृष्टीने अभ्यसनीय आहेत. एवढेच नव्हे तर इंदु (इंदु काळे आणि सरला भोळे) व कालिंदी (ब्राह्मणकन्या) यांच्या रुपानें ज्या समस्या १९३०–३५ च्या दरम्यान सूचित झाल्या, त्याच आज १९५९ सालीं अधिक विचित्र व अधिक विकराळ रूप धारण करून आपल्या पुढे उभ्या आहेत असें दिसून येईल.

१९१९ ते १९३९ या कालखंडानें कितीतरी अविस्मरणीय कथा निर्माण केल्या. 'मृणालिनीचें लावण्य' व 'दंडकारण्यांतली प्रणयिनी' (दिवाकर कृष्ण), 'माणूस जगतो कशासाठीं' व 'न्याय' (ना. सी. फडके), 'शेवग्याच्या शेंगा' आणि 'बहिनीच्या बांगड्या' (य. गो. जोशी), 'वेडी' व 'जखम' (वि. वि. बोकील), 'कुत्र्याचा पट्टा' व 'निर्णय' (दांडेकर)—अशीं किती लेखकांची आणि किती कथांची व कथाकारांचीं नांवें सांगावीत ?

माधव ज्यूलियन यांच्या कवितेंतून झालेला प्रेमभावनेचा मोकळा आविष्कार आणि यशवंतांच्या काव्यांतून विविध रीतींनी व्यक्त झालेली कौटुंबिक प्रेमाची उत्कट भावना यांचा अनुभव केशवसुत, गोविंदाग्रज, बालकवि, या प्रतिभासंपन्न पूर्वसूरींच्या काव्यांत कितीसा येतो ? तांब्यांच्या प्रतिभाविलासाचीं क्षेत्रें केशवसुतांच्या मानाने मर्यादित आहेत. पण त्या दोघांची तुलना करणें म्हणजे हेमंतांतल्या उन्हाची शरदांतल्या चांदण्याशीं तुलना करण्यासारखें आहे. पण तांब्यांच्या प्रतिभेचा आवाका कमी होता हें कबूल केलें तरी त्यांनी साध्यासुध्या, तुमच्या आमच्या सारख्या सामान्य माणसांच्या, पिठामिठाची विवंचना करणाऱ्या आणि तेलातिखटानें माखून गेलेल्या दैनंदिन संसाराचें मंथन करून जें मधुर काव्य निर्माण केलें, त्याचें मोल कमी लेखून कसें चालेल ? 'प्रातकाल हा विशाल भूधर। सुंदर लेणीं तयांत खोदा। निजनामें त्यावरती नोंदा।' किंवा 'ज्ञाताच्या कुंपणावरून। उड्डाण करून। चिद्घनचपला ही जाते। नाचत तेथें चकचकते। अंधुक आकृति। तिस दिसताती। त्या गाताती। निगूढ गीति। त्या गीतींचे, ध्वनि निवर्ती। झपूर्झा गडे झपूर्झा' या ओळींत जेवढें काव्य आहे, तेवढेंच 'संसाररतारीवरि तारा ! तूं, मीहि मदन वाजविणारा।' किंवा 'गुलाब हृदयीं माझ्या फुलला। रंग तुझ्या गालांवर खुलला' या ओळींतहि आहे.

फडक्यांच्या 'गुजगोष्टी,' काणेकरांची 'पिकलीं पानें', चिं. वि. जोश्यांचें 'चिमणराव' अत्र्यांचें 'झेंडूचीं फुलें', रघुवीर सामंतांचें 'हृदय', विठ्ठलराव घाट्यांचे 'कांहीं म्हातारे व एक म्हातारी', लक्ष्मीबाई टिळकांची 'स्मृतिचित्रें', इत्यादि या कालखंडांतलीं पुस्तकें अभिजात अभिरुचीच्या कसोटीला उतरलीं अशीच आहेत. अशा पुस्तकांच्या निर्मितीला १९२० पूर्वीचा काळ मुळींच अनुकूल नव्हता. त्यांत नव्या ध्येयवादाची

उग्रता होती, अभिनव सामाजिक भावनांचा पहिला पूर होता. साहजिकच आवाहन करणें व आव्हान देणें हीच त्या काळांतल्या ललितलेखनाचीं कळत नकळत मुख्य कार्यें झालीं. हरिभाऊ किंवा खाडिलकर हे त्या काळांतले थोर कलावंत, पण त्यांची कला मुख्यतः भावना आणि विचार यांच्या प्रक्षोभांतून निर्माण झाली आहे. समुद्रमंथनांतून लक्ष्मी बाहेर यावी तशी ! तिला स्वतःच्या सौंदर्याची जाणीव नाहीं, उलट, ‘ गुजगोष्टी ’ सारख्या लघुनिबंधांना काय, ‘ कांहीं म्हाताऱ्या ’ सारख्या व्यक्तिचित्रांना काय किंवा ‘ स्मृतिचित्रां ’ सारख्या आत्मवृत्ताला काय, ही प्रक्षोभाची पार्श्वभूमि पोषक झाली नसती. सूर्यविकासी आणि चंद्रविकासी कमळांप्रमाणे ध्येयाच्या प्रेरणेने निर्माण होणारें वाङ्मय आणि कलेच्या प्रेरणेनें निर्माण होणारें वाङ्मय असे भेद साहित्यांत पडतातच. मात्र ध्येयवादी साहित्य कलाशून्य असतें किंवा कलावादी साहित्य ध्येयविन्मुख असतें, असा या भेदांचा धोपट अर्थ करणें म्हणजे श्रेष्ट साहित्यनिर्मितीच्या क्रियेविषयीं अक्षम्य अज्ञान दाखविण्यासारखें आहे. एका कालखंडांत कांहीं कारणांनी जसें ध्येयाला प्राधान्य मिळतें, तसें दुसऱ्या कालखंडांत अन्य कारणांनी कलेचें कोडकौतुक केलें जातें.

१९१९–१९३९ या कालखंडांत ही दुसरी प्रवृत्ति वाढीला लागली. केळकर-कोल्हटकरां-सारख्यांनी वाङ्मयचिकित्सा करतांना या प्रवृत्तीचा पुरस्कार केला होता. पण खुद्द त्यांच्या साहित्यांत कलामूल्यांइतकींच इतर मूल्यांची बूज राखण्याचा प्रयत्न होत होता. त्यामुळें ‘ कलेसाठीं कला ’ या पंथाचें डौलानें फडकणारें निशाण साहित्यक्षेत्रांत दिसूं लागलें तें १९२० नंतरच. या पंथाचें प्रमुख पुरस्कर्ते ना. सी. फडके हे होत. ‘ दौलत ’ कादंबरीच्या निर्मितीची कथा त्यांनी नुकतीच आकाशवाणीवरील एका भाषणांत सांगितली आहे. त्यांत ते म्हणतात, ‘ ही कादंबरी लिहावयास घेतांना एक विषय माझ्या मनांत घोळत होता, आणि कादंबरीची रंजकता न बिघडवितां तो पुढे मांडतां येतो की नाहीं याचा प्रयोग मला करावयाचा होता. ’ ही कादंबरी फडक्यांना स्फुरली ती धंदा व त्यामुळें मिळणारी प्रतिष्ठा आणि पैसा हाच परमेश्वर मानून त्याच्या उपासनेंत प्रीति, वात्सल्य, करुणा इत्यादिकांचे जे अमृतघट कौटुंबिक जीवनांत भरलेले असतात त्यांच्याकडे पाट फिरविणाऱ्या कर्तबगार पण अभागी माणसाचें जीवन पाहून. ‘ दौलत ’ कादंबरीचें हें बीज जितकें नाजुक तितकेंच करुण आहे. त्याचा संपूर्ण कलात्मक विकास झाला असता तर ‘ दौलत ’ दुःखांत झाली असती. तिच्यांतलें भय्यासाहेबांचें दुःख हें किंगलियरच्या दुःखाच्या पंक्तींत बसलें नसतें, मात्र त्याच्या मागच्या रांगेंत कुठेंतरी त्याला निश्चित जागा मिळाली असती ! पण—

इथेंच १९१९–१९३९ या कालखंडांतल्या शेंकडा ऐंशी टक्के ललितवाङ्मयाची खरी शोकांतिका आहे. या कालखंडानें कलेचें निशाण फडकावलें खरें. पण केवळ भगवीं वस्त्रें अंगावर धारण करून जसा कुणी थोर साधु होत नाहीं, त्याप्रमाणें कलेचें बाह्यांग जी कारागिरी तिचा आश्रय करून कुणाला अक्षर वाङ्मय निर्माण करतां येत नाहीं. कारागिरीचें सौंदर्य हें कागदी फुलांसारखें असतें; उलट कलेचे सौंदर्य हें बकुळीच्या फुलांसारखें असतें.

‘ रंजकता ’ किंवा कादंबरी चित्तवेधक आणि चटकदार झाली पाहिजे हा मनांतला अट्टाहास ’ हें फडक्यांसारख्या या कालखंडांतल्या अव्वल दर्जाच्या कलावादी साहित्यिकाचें आणि त्यांच्या निशाणाखाली गोळा झालेल्या अनेक तरुण लेखकांचें मुख्य सूत्र बनून गेलें. कांहींकाळ तंत्र व कला हे शब्द एकाच अर्थाचे आहेत असा भ्रम उत्पन्न झाला. त्यामुळें खोल, नाजूक किंवा उत्कट अनुभूतींकडे आणि त्या आविष्कारांकरिता लागणारी सत्य पण कलात्मक अशी भावस्थितीची पातळी प्राप्त करून घेण्याकडे या कालखंडांतल्या चांगल्या चांगल्या लेखकांचें दुर्लक्ष झालें. रंजकता व रचनाचातुर्य हेच अनेकांचे लोकप्रियतेचे परवल बनले. नांगरांप्रमाणे प्रेमकथांचेहि कारखाने काढतां येतात व स्वप्नाळु स्थितींत वावरणाऱ्या सुखवस्तु मध्यमवर्गातल्या वाचकांच्या मदतीनें ते चालूं शकतात हे ध्यानांत येतांच कलावंताला (artist) अभिप्रेत असलेला सिद्धीचा अवघड मार्ग सोडून कारागिराला (artificer) लाभणाऱ्या तात्पुरत्या यशस्वितेचा सोपा मार्ग या कालखंडांत पुष्कळांनीं चोखाळला. त्यामुळे १९४० च्या आगेमागे या काळांतल्या लिखाणांतहि एक प्रकारचा तोचतोचपणा, नीरसपणा आणि निर्जीवपणा जाणवूं लागला. या परिस्थितींतच दुसरें महायुद्ध सुरू झालें. त्यांत केवळ वॉर्सासारखी शहरेंच जळून बेचिराख झालीं नाहींत. आपल्याकडल्या सुखवस्तु आणि स्वप्नाळु मध्यमवर्गाचीं दिवास्वप्नेंहि त्या ज्वालांच्या ओझरत्या स्पर्शांनी भस्मसात् झालीं. महायुद्धांत युरोपांतल्या अनेक देशांतली हजारों बालकें जशीं निर्वासित झाली, तशीं भारतीय समाजानें मध्यमवर्गाच्या द्वारें पिढ्यान् पिढ्या जोपासलेलीं अनेक जीवनमूल्येंहि देशोधडीला लागलीं. मर्ढेकरांसारख्या कोमल आणि चिंतनशील कवीनें ‘ स्वार्थ बोले ओठीं ओठीं । सत्ता बैसे पैशापाठीं; । येरागबाळांच्या गाठीं । अर्ध पोट ॥ ’ ‘कुठे गया, कुठे मक्का । हत्याकांड येथे फुका । भुके कंगालिस्तान का । झिंदाबाद ’ ‘ पृथ्वीची तिरडी । ( एरव्हीं परडी । फुलांनी भरली ! ) जळो देवा, भली ! ’ असे तळमळून उद्गार काढावेत, अशीच ही परिस्थिति होती.

मर्ढेकर, गोखले, गंगाधर गाडगीळ प्रभृति १९४० नंतर ललितवाङ्मयाच्या आघाडीवर आलेल्या आणि जुन्या चाकोऱ्यांतून बाहेर पडून लिहूं लागलेल्या साहित्यिकांचें मूल्यमापन करतांना त्यांच्या लेखनाला लागलेले नवें वळण तीन प्रकारच्या तीव्र प्रतिक्रियांतून निर्माण झालें हें लक्षांत ठेवले पाहिजे. तसें पाहिलें तर कुसुमाग्रज, बोरकर, चोरघडे, कुसुमावती देशपांडे इत्यादि मंडळी कालदृष्ट्या या साहित्यिकांना अगदी जवळची होती. कलादृष्ट्या त्यांच्यापैकी प्रत्येकाने आपलें वैशिष्ट्य प्रगट केलें होतें. पण असें असूनहि कुसुमाग्रज–बोरकर व रेगे–मर्ढेकर आणि चोरघडे–देशपांडे व गोखले–गाडगीळ यांच्यामध्ये एक रुंद दरी पसरलेली दिसते. याचा अर्थ उघड आहे. मराठी साहित्याला मर्ढेकर–गाडगीळांच्या द्वारें जें नवें वळण लागलें तें संथ संक्रमणांतून निर्माण झालेलें नाहीं. मागच्या कालखंडाला पुढच्याशीं जोडणारा पूल इथें आढळत नाहीं. कोंडाणा सर करतांना सूर्याजीनें जसे दोर कापून टाकून पळपुट्या मावळ्यांना मागे फिरणें अशक्य करून सोडलें, तशी आपली स्थिति झाली आहे, आपण भूतकाळाशी कोणत्याच दृष्टीनें

अनुक्रमणिका

समरस होऊं शकत नाहीं, असें या नव्या ललितलेखकांना वाटूं लागलें. त्यांची ही मनःस्थिति तीन प्रकारच्या प्रतिक्रियांनी घडलेली. मध्यमवर्गीय, जागतिक आणि कलात्मक अशा त्या भिन्न भिन्न प्रतिक्रिया होत्या.

दुसरें महायुद्ध अन्ननियंत्रण घेऊन आलें; लाखों लोकांना टांचा घाशीत प्राण सोडायला लावणारा बंगालमधला दुष्काळ घेऊन आलें. मग जागेच्या टंचाईमुळे तरुणांच्या जीवनाची कुतरओढ सुरू झाली. एकच कर्ता पुरुष मिळविता असायचा अशी परंपरा असणाऱ्या मध्यमवर्गाला न परवडणारी महागाई थैमान घालूं लागली. यांतल्या प्रत्येक चटक्यानें मध्यमवर्गाचें स्वप्नाळु मन किंचाळत उठले—थोडेफार जागें झालें. पण तें जागें झालें मात्र चिडक्या मनःस्थितींत ! ध्यानीं, मनीं, स्वप्नीं नसलेलें असुरक्षित जीवन त्याच्यापुढें दत्त म्हणून उभें राहिलें होतें ! हें नवें जीवन जगतांना जुन्या मूल्यांचा आधार पुरा पडेना ! नवा मूल्यांचा स्वीकार हंसतमुखानें आणि उघड्या डोळ्यांनी करायला लागणारे मानसिक धैर्य आणि शारीरिक बळ पिढ्यान्‌पिढ्या सुरक्षित घरकुलांत वाढलेल्यांच्या ठिकाणीं कुठून येणार ? यंत्रयुगानें निर्माण केलेल्या नव्या सामाजिक आणि मानसिक गुंतागुंतीची उदाहरणें जुन्या बालबोध रीतीनी सुटेनात ! साहजिकच निराशा, वैफल्य, अश्रद्धा, यांची काळी छाया मध्यमवर्गाच्या जीवनावर पसरली. माणसाची स्वतःवरली श्रद्धा उडली की त्याची जगावर असलेली नसलेली श्रद्धाहि उडून जाते. तसेंच थोडेंसें या कालखंडाच्या प्रारंभीं घडलें.

दुसऱ्या महायुद्धानें परंपरागत मानवी मूल्यांचा चोळामोळा करून टाकला होता. नीति, दया, माणुसकी हे शब्द सद्भावानें उच्चारले तरी ते ढोंगीपणाचे वाटावे इतके जपान-रशियापासून जर्मनी अमेरिकेपर्यंतचे समाज, बधिर झाले होते. पहिल्या महायुद्धापासूनच पाश्चात्त्य कलावंतांचें मन मानवी जीवनाचें आजपर्यंत न दिसलेलें भेसूर रूप पाहून भांबावून गेलें होतें—त्याचा अर्थ बुद्धि किंवा भावना, धर्म किंवा नीति यांना लावतां येत नाहीं असें पाहून तो वासना व तिची क्षणिक तृप्ति यांच्या द्वारें लागतो कीं काय याचा शोध घेत होतें—फ्रॉइडसारख्या शास्त्रज्ञांच्या मदतीनें या नवीन शोधाला अंतिम सत्याची प्रतिष्ठा प्राप्त करून देण्याचा प्रयत्न करीत होतें. त्यामुळें तिकडील ललित वाङ्मयाची बैठक मुळापासून बदलूं लागली होती. दुसऱ्या महायुद्धानें तो बदल दृढ केला. या बदलामुळें आपल्या साहित्यिकांचीं दैवतें पुन्हा एकदा बदललीं. शेले-वर्डस्वर्थचें स्थान इलियट, पाऊंड प्रभृतिमंडळींनी पटकाविलें. शेक्सपिअर-मोलिअरच्या स्थानीं शॉ-इब्सेन बसूं पाहत होते. पण मधल्या मधेंच त्यांचें उच्चाटन होऊन तिथें पिरँडेलो-टेनेसी विल्यम्स यांना बसविण्यांत आलें. स्कॉट-डिकेन्स किंवा ओ हेन्री-चेकॉव्ह ही कथाक्षेत्रांतलीं दैवतें दूर फेकलीं गेलीं. त्यांच्या जागीं बेटस्-हेमिंग्वे आणि जॉइस-काल्डवेल यांची पूजा सुरू झाली. इतकेंच नव्हे तर साहित्यकलेविषयींच्या परंपरागत कल्पनांपेक्षां अगदीं भिन्न अशा कल्पना प्रमाण मानून १९४० नंतरच्या कालखंडांतलें ललितवाङ्मय आपलीं पावलें पुढें टाकूं लागलें.

१९३९ नंतरच्या या कालखंडांतल्या लेखनाविषयीं अजून आपल्याकडे वादविवाद सुरू आहेत. साहित्यसंमेलनांचे अध्यक्ष त्याचें दोषदिग्दर्शन करण्यांत दंग होत आहेत. कुणी या काळांतल्या लेखनावर अव्यवस्थित प्रज्ञेचा आक्षेप घेत आहेत, कुणी त्यांत जंतुवादी क्षुद्रत्व आहे म्हणून नाकं मुरडीत आहेत. व्यक्तिशः मला असें वाटतें कीं १९३९ नंतरच्या पहिल्या दशकांत जुन्याला कंटाळलेल्या टीकाकारांनी आणि रसिकांनी त्याचें स्वागत करतांना जसें त्याच्या दोषांकडे दुर्लक्ष केलें, तसे आज त्याचे नातवर विरोधक त्याच्या गुणांकडे काणाडोळा करीत आहेत. मराठी ललित वाङ्मयाच्या विकासाला या कालखंडानें निश्चित मोठा हातभार लावला आहे. या काळांतले मर्ढेकर, विंदा करंदीकर, इंदिरा संत प्रभृति कवि, गोखले, गाडगीळ माडगूळकर इत्यादि कथाकार, दुर्गा भागवत, ना. ग. गोरे, इरावती कर्वे वगैरे ललितनिबंधकार, पु. ल. देशपांडे, वसंत कानेटकर, पु. शि. रेगे ( रंगपांचालिक ) प्रभृति नाटककार—यांच्या प्रतिभेविषयीं कोण शंका घेईल ? त्यांनी केलेले अनेक प्रयोग फसले असले तरी त्यांच्या यशस्वी प्रयोगांनी मराठी काव्य, कथा, नाट्य, निबंध यांची आशय आणि अभिव्यक्ति या दोन्ही बाबतींत नव्या वाटांनी झालेली प्रगति अमान्य करणाऱ्या मनुष्याची आणि रसिकतेची उभ्या जन्मांत गांठ पडली नसावी असेंच म्हणावें लागेल !

या कालखंडांतल्या निर्मितींत पहिली मोठी गोष्ट घडली ती ही कीं मराठी ललितवाङ्मय कलेच्या दृष्टीनें अंतर्मुख झालें. विस्तार हाच मागच्या कालखंडाचा स्थायीभाव असल्यामुळें आणि १९२० पूर्वीच्या अंतर्मुखतेचा सामाजिक चिंतनाशीं अधिक संबंध असल्यामुळें व्यक्तिमनाचें सूक्ष्म चित्रण त्यांत सदैव आढळत नसे. पण १९४० नंतरची अंतर्मुखता

## गाथा सप्तशती

थोडा वेळ पुरुषाचें अनुकरण केलेंस, तर तेवढ्यांत तुझे केंस मोराच्या पिसाऱ्यासारखे विखुरले, मांड्या थरकापूं लागल्या, डोळ्यांवर झांपड आली व तूं थकून गेलीस. थोडा वेळ विश्रांति घे आणि पुरुषांना किती श्रम होतात याची कल्पना कर !



बाता सप्तशती : १९५९

जाणीवेनें किंवा परंपरागत संकेतांनी बांधली गेलेली नव्हती. त्यामुळें व्यक्तीच्या मनांत व जीवनांत अधिक खोल जाण्याची शक्ति तेच्या अंगीं निर्माण झाली.

या अंतर्मुखतेमुळें ललितवाङ्मयाला नव्या प्रकारची काव्यात्मता लाभली. श्रीपाद कृष्ण, शिवरामपंत परांजपे, गडकरी, शिरवाडकर, पु. भा. भावे इत्यादिकांच्या गद्यांत काव्य नव्हतें असें नाहीं, पण त्या काव्यांत चमत्कृति, अलंकरण कल्पनाविलास यांना प्राधान्य होतें. १९४० नंतरच्या ललितवाङ्मयांतली काव्यात्मता ही अधिक नाजुक व संवेदनशील झाली. मनाच्या भावमधुर किंवा भावकरुण छटा टिपण्यांत तिनें मराठीला पूर्वी अपरिचित असलेलें असें कौशल्य प्रगट केलें. मर्ढेकरांच्या या कवितेला विरोधक नाकें मुरडीत आले, ती मूलतः कविमनाच्या सामाजिक प्रतिक्रियेचा आविष्कारच आहे, पण तशा प्रकारची मर्ढेकरांची कविता सोडून दिली तरी ' न्हालेल्या जणु गर्भवतीच्या ', ' आला आषाढश्रावण ', या त्यांच्या कवितांत नव्या प्रकारचें सौंदर्य काय कमी आहे ? गंगाधर गाडगीळांच्या ' उध्वस्त विश्व ', ' तलावांतलें चांदणें ', ' कबुतरें ', ' काजवा ' या चार कथा वाचल्या तरी मराठी कथेनें १९४० नंतर काय कमावलें याची नीट कल्पना येते. रेग्यांचें ' रंगपांचालिक ' व पु. ल. देशपांड्यांचें ' तुझें आहे तुजपाशीं ' यांची जोडी अगदी भिन्न प्रकारची आहे, पण वाङ्मयाच्या विकासाच्या दृष्टीनें ही निश्चित पुढे टाकलेलीं पावलें आहेत, ' माणदेशी माणसें ', ' ऋतुचक्र, ' ' डाली, ' ' गारंबीचा बापू, ' ' रा, ' ' परिपूर्ति ' ' स्पर्शाची पालवी, ' ' वाटचाल '—ज्यांचें सौंदर्य एकाददुसऱ्या दशकांत कोमेजून जाणार नाहीं अशी कितीतरी पुस्तकें या कालखंडांत निर्माण झालेलीं आहेत. कथा व काव्य या क्षेत्रांत कितीतरी त्र भिन्न प्रकारच्या प्रतिभा बहरून त्यांच्या ांचा सडा पडला आहे. सूक्ष्म प्रकारची काव्यात्मता, नव्या पद्धतीची अंतर्मुखता, आणि कलात्मक अलिप्तता यांची जोड या कालखंडांत मराठी वाङ्मयाला निश्चित लाभली. इतकेंच नव्हे, तर रंजन, भावनांना आवाहन, आणि अनुभूतींचें सामाजिक मूल्यमापन यांच्या पलीकडे जाऊन शुद्ध जीवनदर्शनाच्या पातळीला स्पर्श करण्याचाहि नव्या कलावंतांनी प्रयत्न केला आहे ?

असें असूनहि या कालखंडाचे एकाकाळचे पुरस्कर्ते आज त्याचे टीकाकार झालेले दिसत आहेत ! १९२० नंतरच्या कालखंडाच्या शेवटीं तोचतोचपणा, नीरसता आणि निर्जीवता यांचें प्राबल्य झालें होतें. १९४० नंतरच्या श्रेष्ठ लेखकांच्या आंधळ्या अनुकरणानें आणि सामान्यांना न पेलणाऱ्या प्रयोगशीलतेनें तीच परिस्थिति आज पुन्हा निर्माण झालेली दिसत आहे. आपल्या जीवनापेक्षा पाश्चात्त्य पुस्तकांवर नजर लावून केलेल्या प्रयोगांतून क्लिष्टता, दुर्बोधता व नीरसता निष्पन्न झालीं नाहींत तरच नवल ! वास्तवाच्या नांवाखाली जीवनांतल्या—बहुधा मूठभर मर्यादित लोकांच्या—अमंगलाचें ( विशेषतः कामवासनेच्या विपरीत आविष्काराचें ) नावीन्य म्हणून प्रथम कौतुक झालें. पण उबग यावा इतका या प्रकाराचा अतिरेक झाला आहे. या बाबतींत वामनराव जोश्यानीं ' वाङ्मयीन महात्मते 'च्या प्रस्तावनेंत दिलेला इषारा कलावंत म्हणविणारांनी सदैव लक्षांत ठेवला पाहिजे. वामनराव म्हणतात, ' केवळ इंद्रियजन्य सुखाची आठवण करून देणारीं आणि गुप्त-सुप्त इच्छेची पूर्ति करून आनंद देण्यास प्रवृत्त झालेली शृंगारिक वर्णनें हीं खरोखर शृंगाररस निर्माण करणारीं नसून रसोत्पत्ति करण्याच्या मिषानें, प्रच्छन्नतेनें इंद्रियसुख देणारीं साधनें आहेत......प्रच्छन्नतेनें केवळ इच्छापूर्ति करूं पाहणारीं वर्णनें, गाणीं, चित्रें, वगैरे अतृप्त जीवांस प्रिय वाटतील, त्यांना बाजारभाव असेल, पण तीं कलादृष्ट्या मूल्यवान्, आदरणीय व शिष्टसंमत होऊं शकणार नाहींत. '

हें सर्व लक्षांत घेऊन १९३९ ते १९५६ या कालखंडानें रूढ केलेल्या अनेक वृत्तींचा व प्रवृत्तींचा आजउद्याच्या तरुण ललितलेखकांनी विचार करणें जरूर आहे. सूक्ष्म प्रकारची काव्यात्मता व भेदक अंतर्मुखता हेच ललित वाङ्मयांतले परवल झाले कीं भव्य कलाकृति निर्माण करण्याची कुवत कमी होते, असा गेल्या दीड तपांतला अनुभव नाहीं काय ? या दीड तपांत मराठी कादंबरी फारशी फुलली नाहीं. जी फुलली ती फक्त प्रादेशिकतेच्या दिशेनें—म्हणजे विशाल जीवनांतला एका लहान व सोइस्कर असा हस्तिदंती तुकडा कापून घेऊन त्याच्यावर चिमुकली मूर्ति कोरण्याकरता ! गेल्या दहापंधरा वर्षांत हरिभाऊंच्या विशाल अनुभूतीच्या मार्गानें जाण्याची धडपड जशी कादंबरींत झाली नाही, ( अपवाद फक्त दिघ्यांचा. पण ते १९४० पूर्वीचेच लेखक ) तसा नाटकांत शोकांतिकेकडे वळण्याचाहि कुणी फारसा प्रयत्न केला नाहीं. विजय तेंडुलकरांचीं असल्या प्रकारचीं नाटकें शोकांतिकांना आवश्यक असणाऱ्या काव्यात्म शैलीच्या अभावीं फिक्कीं पडलीं आहेत. वसंत कानेटकरांचें ' वेड्याचें घर उन्हांत ' हें तंत्र आणि मनोविश्लेषण यांच्या जाळ्यांत अडकल्यामुळें अपेक्षित उंची गांठू शकत नाही. साहजिकच बऱ्याबाईट विनोदी नाटकांना ऊत आला आहे आणि या विनोदावर कळस म्हणूनच कीं काय ' करायला गेलों एक ' हें नाटक आपले सर्वांत अधिक प्रयोग झालें म्हणून मोठ्या ऐटीनें मिरवीत आहे !

हे कवि दुसरे केशवसुत आहेत, ते कादंबरीकार तिसरे हरिभाऊ आहेत, अशा प्रकारच्या घोषणांनी कांही नवे केशवसुत किंवा नवे हरिभाऊ निर्माण होत नाहींत. मनाच्या खोलीइतकीच त्याची उंची गांठण्याची शक्ति ज्यांच्या प्रतिभेंत असेल, इतर कला असामाजिक होऊं शकल्या तरी साहित्याला तसें होतां येत नाहीं तें तसें झालें कीं मूठभर सुशिक्षितांच्या आणि बुद्धिनिष्ठांच्या कोंडाळ्यापलीकडे तें जाऊं शकत नाहीं याची जाणीव ज्यांच्या रोमरोमीं भिनली असेल, असे नव्या दमाचें प्रतिभावान् लेखकच आतां ललितवाङ्मयाला पुढलें नवें वळण लावूं शकतील. श्रेष्ठप्रतीची सृजनशील प्रतिभा विशाल जीवन आणि त्याचे नवनिर्मितीचे नानाविध प्रयत्न यांच्याशीं स्वभावतःच समरस होते व कधींहि न कोमेजणाऱ्या आपल्या फुलोऱ्याला आवश्यक असा जीवनरस त्यांतून मिळवितें. शेक्सपीअरपासून शरच्चंद्रापर्यंतचे सर्व साहित्यिक याच अमरपथावरले मार्गदर्शक आहेत.







अनुक्रमणिका

अखेर स्त्रीवर मी विजय मिळवला होता. मला ती शरण आली होती. मी तिला आधाशाक्षारखा हुंगीत होतो, चाटीत होतो आणि ती व्याकुळ होऊन माझी करुणा भाकीत होती. माझ्यापुढें ती दुबळी ठरली होती. तिचा अखेरपर्यंत मी पिच्छा पुरविला. तिची पाठ मी शेवटपर्यंत सोडली नाहीं.

# दाह



शिरीष पै

'आता गजाभाऊंचं लग्न कधी करणार ?' केशवकाका अण्णाला विचारीत होते. अण्णानें आधीं भुवया वर चढवल्या, मग ओट उपहासानें वाकडे केले आणि तो माझ्याकडे नुसताच बघत राहिला. 'विचार करून पाहण्याजोगा प्रश्न विचारलांत ' तो अखेर थंड निर्विकार स्वरांत बोलला. 'करा, करा आतां. वेळच्या वेळीं गोष्टी झालेल्या बऱ्या असतात, ' केशवकाका उठता उठता खोचकपणें म्हणाले. अण्णा त्याचें तें नेहमीचें बोचरें हसू हसला. माझ्याकडे तो सारखा रोखून बघत होता. रस्त्यांत उकीरड्यावर कुजून पडलेल्या घाणीकडे मनुष्य जसा बघेल तसाच ! केशवकाकांना पोचवायला तो

बाहेर गेला. मी समोरच्या आरशांत नकळत पाहिलें. दूरून प
माझें समाधान होईना म्हणून मी आरशाजवळ जाऊन उभा राहि
हाच का मी ? हा स्थूल, बुटका, ऐन तारुण्यांत पोट सुटलेला. म
पँट पोटावर घट्ट बसली होती आणि कमरेखालील शरीर एख
स्त्रीसारखे वेडेवाकडे वाढलेलें होतें. लाल चट्टे पडलेला गोरा
माझ्या बावळटपणांत अकारणच भर घालीत होता. डोळ्
चष्मा--वेढब कपाळ—अंगावरचे नेहमी घामाने भिजलेले कपडे
हाच का मी ? छे ! माझा नाहीं विश्वास बसत ह्या समोरच्या !
बिंबावर. हा कोण सैतान मला हिणवीत उभा आहे ? हा खात्रीने









अनुक्रमणिका

नव्हे. मी ह्याच्यापेक्षां कितीतरी चांगला दिसतो. मग हा कोण ? हा कोण ? मी भय वाटून बाजूला सरलों.

तेवढ्यांत अण्णा आंत आला. माझ्याकडे त्यानें ढुंकून बघितलें सुद्धा नाहीं. बघितलें असतेंच तर त्याची नजर मला म्हणाली असती-- ' म्हणे लग्न ? तुला बावळटाला कशाला पाहिजे लग्न ? कोण लग्न करणार तुझ्याशी ? कोण बायको देणार तुला ? आहे काय तुझ्यांत ? चल हो बाजूला ! म्हणे लग्न करा तुझं ! नाहीं लग्न केलं तर काही मरत नाहीस तू ! ' गेलीं अनेक वर्षे त्याची नजर माझा असाच उपहास करीत आली आहे. नुसता उपहास नव्हे, नुसती कुचेष्टा नव्हे, तर जळजळीत तिरस्कारहि भरलेला आहे त्याच्या नजरेंत. आणि मी तें सारें मुकाट्यानें सहन करीत आलो आहे. अण्णाला उलटून बोलण्याचें माझ्यांत धैर्य नाहीं. माझ्यांत तेवढी ताकदच नाहीं. बोलूनचालून बावळट माणूस आहे ना मी ! अण्णानें एखादी दमदार शिवी मला हासडली असती तरी तें परवडलें असतें मला. पण अण्णा शिवी देत नाहीं. तो नुसता म्हणतो—बावळट ! आई मला जन्म देऊन जग सोडून गेली बाबाहि कालांतरानें निघून गेले. म्हातारपणांतलें एक दुबळें अपत्य मागे उरलें. कर्तबगार थोरल्या भावाच्या घरांत भाकरीचे तुकडे झेलीत जगणाऱ्या गावठी कुत्र्याचें जिणें जगत वाढूं लागलें. एक मठ्ठ, मंद आणि कुरुप जीव नुसता बकाणे भरीत पोसला जाऊं लागला. 'बावळट,' ' बावळट,' एवढेंच कौतुक थुंकीसारखे गिळीत घरामध्यें वावरूं लागला. तो शाळेमध्यें धडपणें शिकत नव्हता. त्याला काहीं येत नव्हतें. कांहीं समजत नव्हतें. जीभ जड असल्यानें त्याला एक वाक्यहि धड बोलता येत नव्हते. सारा दिवस तो खिन्न मरगळलेल्या अवस्थेंत राही. फक्त जेवतांना तो आनंदांत असे. पोट फुटेपर्यंत तो अन्न घशांत कोंबी. गचकाळ्या येईपर्यंत तो बकाबका गिळत राहीं. सारी रात्र तो गुरासारखा ढाराढूर झोपा काढी. कधीं कधीं तर तो दिवसाहि झोप अनावर होऊन पेंगत राही. एक अक्कलशून्य, वेडावाकडा वाढत चाललेला घृणास्पद प्राणी, माणसाचें नांव उगीचच घेऊन मिरवीत होता.

शाळेमध्यें माझी कांहींच प्रगती होईना. तेव्हां अण्णा मला एके दिवशीं म्हणाला, ' तूं अजूनहि शाळेंत जातोस हें लोकांना सांगायची लाज वाटते मला. पुरे झालं तुझं शिक्षणाचं सोंग. कळली तुझी अक्कल. कांहीं एक येणार नाहीं तुला. आता मुकाट्यानं घरी तरी बस नाहींतर नोकरी तरी कर. '

मी कांहींच बोललों नाहीं. काय बोलणार ? अक्कल नसलेल्या माणसांना मन कसलं नी काय कसलं ? कशीतरी रदबदली करून अण्णानें मला एका कचेरींत चिकटवून दिलें. एका डोकें नसलेल्या प्राण्याचें दिलेल्या किल्लीबरहुकुम चालणारें एक यंत्र बनलें. सकाळ-पासून संध्याकाळपर्यंत ते खुर्चीत अडकून बसे आणि लांब लांब याद्या तयार करी. कागदांचे ताव नुसत्या अक्षरांनीं भरून काढी. कधी नुसत्या नकला बनवी. तें भावनाशून्य यंत्र संध्याकाळीं दमून भागून घरीं परत येई आणि बकाबका गोळे गिळून मेल्यासारखें घोरत पडे. तें जगत होतें तरीहि जिवंत नव्हतें.

आणि एके दिवशीं त्या यंत्राला समजलें कीं त्याला शरीर आहे त्याला अवयव आहेत, त्याच्या अवयवांना अर्थ आहे. पुरतेपणी न जाणवलेल्या गोष्टी अचानक स्पष्ट कळल्या..

उन्हाळ्याचे दिवस होते ते. घराचीं दारें सताड उघडी टाकून माणसें झोपत होती. मी नेहमीप्रमाणें घराच्या ओट्यावर पडलो होतों. शेजारच्या बिऱ्हाडांतलीं मुलेंहि ओट्यावर झोपलीं होती आणि नवराबायको मात्र आतल्या खोलींत झोपले होते. रात्रीं मला अचानक जाग आली. सारें अंग घामानें भिजलें होतें. मी उठून बसलों जवळच्या तांब्यांतलें पाणी घटाघट प्यालों. पण तहान पुरती भागलीच नव्हती. सारें अंग दाह होत असल्याप्रमाणें तळमळत होतें. शेवटीं मी उठलों आणि ओट्यावर येरझारा घालूं लागलों. त्या शांत रात्री एकाएकीं कसला तरी चमत्कारिक हसण्याचा ध्वनि माझ्या कानावर पडला. शेजारच्या बिऱ्हाडाच्या आतल्या खोलींतून धूपाच्या वासा सारखा तो ध्वनि दरवळत आला. मी भारला गेल्याप्रमाणें ओट्या वरून चालत जाऊन शेजारच्या खोलीच्या दारांत उभा राहिलो. पुढचें दार उघडेंच होतें. पुढची खोली रिकामी होती. मधल्या खोलीचा झिरझिरीत पडदा पाडलेला होता आणि खोलीमध्यें रात्री जळत ठेवण्यात येणारा सूक्ष्म मंद प्रकाशाचा दिवा पेटलेला होता. मी मागचापुढचा विचार न करता घरांत शिरलो आणि पडद्याच्या फटींतून आतमध्यें डोकावून पाहिले.

मंद दिव्याच्या धूसर अस्पष्ट प्रकाशांत मी असें काही पाहिलें कीं जें माझ्या कल्पनेंलाहि कधीं स्पष्टपणें चितारता आलें नव्हतें. मी पाहिलीं तीं दोन शरीरें नव्हतीं. एक स्त्रीचा आणि एक पुरुषाचा असे ते भिन्न देह नव्हते तर एकस्या वासनेचाच तो एक वेडा-वाकडा, वेदनांनीं पिळला गेलेला अजस्र देह होता. तें दृश्य पाहता पाहता माझें अंग सर्पदंश झाल्याप्रमाणें सुन्न आणि चेतनाशून्य होत गेलें. मी तसाच माघारीं फिरलों. मला पुन्हा परत आत जावेसें वाटलें. तें विलक्षण दृश्य डोळे ताठ करून पुन्हा नुसत्या डोळ्यांनींच निपटा-वेसें वाटलें. पण तसें करण्यांत आता धोका होता. शेवटी मी एकटा, एकाकीच संवेदनाविहीन अवस्थेंत खुळचटासारखा तळमळत पडलों. दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी उठलो तेव्हां अतिशय भ्यालों होतों. माझें हें अपकृत्य कोणी पाहिलें तर नसेल ना ? चारचौघांत शेजारचा माणूस मला वहाणांनी झोडपून तर काढणार नाहीं ना ? जर हें अण्णाला कळलें तर तो मला घरांत तरी ठेवील काय ?

तो सारा दिवस मी भ्रमिष्ठावस्थेंत घालविला. सारा दिवस मस्तक जसें चहूकडून पेटलें होतें. तरी पण मला एकाएकीं जीवंत झाल्या-सारखें वाटूं लागलें. माझ्यासारखा एक मुर्दाड प्राणी इतका चेत-विला जाऊं शकतो ह्याचेंच मला आश्चर्य वाटलें. त्या दिवशीं मी घरीं परतलों तो एखादी अद्‌भूत चेतना साऱ्या शरीरांत खेळत असल्याचा भास बरोबर घेऊन. रात्र पडण्याची मी वाट पहात होतो. इतर सारे झोपले पण मी जागाच होतो. सारें लक्ष्य शेजारच्या बिऱ्हाडावर ठेवूनच. कान, डोळे, सारें शरीर शेजारची चाहूल घेत खोळंबून बसलें होतें. निगरगट्ट मनानें मी त्याहि रात्रीं भुरट्या चोरासारखा तो खाजगी क्षणांचा ठेवा लुबाडला.

एकाच रात्रीं नव्हे तर अनेक रात्रीं......उन्हाळा असेतोपर्यंत मी







अनुक्रमणिका

एकहि संधी वाया दवडली नाहीं. कधीं कधीं रात्रीचें तें दृश्य पहातांना मला भय वाटूं लागे. समोर तो दुसरा पुरुष नसून मीच तो आहे असा भेसूर भास मला पछाडूं लागे. मग माझा माझ्यावरील ताबा सुटत जाई. माझ्या सर्वांगाचा थरकाप उडे. वाटूं लागे, माझा अचानक तोल सुटला तर! मी एखादे दिवशीं चढून त्या स्त्रीचा उपमर्द केला तर! छेः छेः, हें सारें थांबवावयास हवें होतें. मी अखेर माघारीं फिरलों.

माझ्या सर्वांग शरीरांत जागा होऊं लागलेल्या त्या चेतनेची मला भिती वाटूं लागली. तिचा गळा दाबून मी तिला नेस्तनाबूत करण्याचा प्रयत्न करूं लागलों. पण ती मला सोडत नव्हती. मी भयंकर भ्यालों. पुढें पुढें तर इतका भ्यालों कीं रात्रीं मी जणु बिछान्याला साखळ-दंडांनीं हातपाय जखडून टाकल्याप्रमाणें अंग आकरून पडून राही. इकडच्या कुशीवरून तिकडच्या कुशीवर वळण्याचेंहि मला भय वाटे. ह्याला एकच उपाय होता. अण्णानें माझें आता लग्न करून टाकावयास हवें होतें. कधी कधी वाटे कीं, अण्णासमोर सारी लाज सोडून उभे रहावें आणि म्हणावें, 'अरे मला नको का एक बायको? मीच असा काय अपराध केला आहे म्हणून तूं मला अशी घोर एकांतवासाची शिक्षा दिली आहेस? माझं लग्न कर आणि माझ्यावर दया कर.'

अखेर माझी कुणाला तरी दया आली आणि ती व्यक्ति अण्णाला म्हणाली, गजाभाऊचं लग्न करा की आता! अण्णा काहीं उत्तर द्यावयाच्या ऐवजी पोटधरून हसला आणि म्हणाला, लग्न करायला जवळ काहीं भांडवल तर पाहिजे. ह्याला ह्याची बायको जवळ तरी उभी करील का? ह्याचं पोट भरण्याइतकं तरी हा कमावतो का? दगडोबा कुठचा! त्याला पाहिजे कशाला लग्न? लग्नावाचून काहीं बिघडत नाहीं त्याचं. उलट त्यानं लग्न न केल्यास एका स्त्रीचं आयुष्य तरी बरबाद व्हायचं टळेल! अण्णा सारखा हसतच राहिलो.

मी रडलो नाहीं आणि हसलोहि नाहीं. मी फक्त कुणालाहि न ऐकूं जाणारे हुंदके आतल्या आंत घुमवीत तटस्थ उभा राहिली. मला लग्नाची जरुरी नव्हती काय? मग तुला तरी कशाला पाहिजे होतं लग्न? तुला कशाला हवी होती बायको? तू पुरुष आहेस आणि मी पुरुष नाहीं काय? ठीक आहे! पाहून घेईन—मीं नुसता पोकळ धमक्या देत होतो. बिळांतल्या उंदरासारखा!

बायको! लग्न!! बस्स, ह्या एकाच विचारानें मला रात्रंदिवस पछाडून टाकलें. हिंस्र पशूला भक्ष्याखेरीज दुसरी कशाचीहि आठवण येत नाहीं तशी मला केवळ स्त्रीखेरीज कसलीच गोष्ट सुचेना. का? का? मला बायको का नाहीं? स्त्रीचं सुख मला नाकारण्यात का यावं? लग्न करण्याची माझी लायकी का नसावी? संध्याकाळीं मी रस्त्यावर भ्रमिष्टासारखा भटकत राही. रस्त्यावर फिरणाऱ्या स्त्रियांना टक लावून न्याहाळीत जाई. सुंदर वा कुरुप असा प्रश्नच नव्हता. नुसती स्त्री दिसली तरी मला तेवढेंच पुरे होतें! नुसती शरीर असलेली, शरीर देऊं शकणारी स्त्री. कधी कधी मला वाटे कीं ह्यातली एखादी स्त्री तरी आपणहून माझ्याकडे येईल आणि मला म्हणेल, 'मला तुम्ही आवडता. मी तुमच्याशी लग्न करायला तयार आहे.' पण कोणीहि स्त्री माझ्याकडे ढुंकून पहायला तयार नव्हती.



दीडशें वर्षांपूर्वीचा महाराष्ट्र

# पेशवाईंती[ल] भोजन :

" खासे पंगतीस केळीची पाने चांगली थोर मांडावी. [...] व डागीळ नवेत. द्रोण दर पानास दहा बारापर्यंत मांडा[वे] चांगले दोही काड्यांचे केळीचे नोकदार असावे. चांगल्या [...] रुमाल रांगोळ्यानी रांगोळी घालावी. ती हिरवी, पांढरी, गु[...] वगैरे, तऱ्हेतऱ्हेची असावी. पाट एके सुताने तारवे मां[...] त्यांत खासे पंगतीस रुप्याच्या फुलांचे वगैरे चांगले थोर एक[...] पाहून बसावयास व जागा असेल तसे टेकावयास मांडावे. पंगतीस उदबत्तीची घरे व झाडे रुप्याची असतील ती [...] वरकड जागा सोंगटी मांडावी. केशरी गंध अर्काचे व मध्यम दोन प्रकारचें करावें. केशरी गंधांत केशराची कसर [...] अक्षता उंची कस्तुरीची व मध्यम कस्तुरीची अशा दोन कर[...] गंध लावणारे चांगले कुशल चौकस माणूस असावे. [...] साखळीने कपाळी लावावें. वाकडे गंध लावूं नये. अक्षत [...] समयी नाकास धक्का न लागतां कपाळाचा मध्य पाहून [...] मोठी अक्षत ओघळ न येता वाटोळी लावावी. गंध उभे [...] ज्यास जसे पाहिजे तसे. गंध अक्षता लावणार यानी नखे [...] बोटे चांगली करून लावावे.

" अंगास लावावयास केशर व अर्गजा वगैरे सुवासिक [...] साधे पांढरे एक व गुलाबी चन्दनाचे व कृष्णागराचें या[...] चांगली उगाळावी. हातास लावण्याचें गंध देतेसमयी भागीर[...] गुलाब वाटीत पुढें ठेवीत होते.

" भोजनास भात साधा दोन प्रकारचा. खासा व म[...] साखरभात व वांग्याचा भात वगैरे दररोज सरासरी दोन [...] जावे. वरण तुरीचे. सांबारी दोन प्रकारची. आमटी दोन प्रक[...] लोणचे दहा प्रकारचे चिरून व साखरेचे लोणचे. कढी सा[...] प्रकारची. भाजा दहा बारा प्रकारच्या कराव्या. त्यांत एक [...] प्रकार तोंडली पडवळे वगैरे. मागाहून उष्ण व सगळी वांगी उष्ण वाढावी. क्षीर वळवटे दोन प्रकारची. दररोज खिरी प्रकारच्या निरनिराळ्या. पूर्ण पोळ्या सपीटाच्या. पक्वान्नें फेण्या वगैरे तीन चार प्रकार दररोज. वडे साधे व व[...] डाळीचे कढिवडे. तूप साजूक फार चांगले व मध्यम. चक्का, श्रीखंड. आंबरस, खिचडी, ओले हरभरे यांचे डा[...]




वगैरे प्रत्यहीं एक प्रकारची. पापड, सांडगे, फेण्या, तिळवडे, चिकवड्या, मीरगोंडे वोडे, मेक्यांच्या काचऱ्या, चांगल्या कोशिंबिरी वीस प्रकारच्या. तिखट चटण्या चांगल्या बारीक वाटून रुचिकर कराव्या. निंबे चिरून पंचामृत, रायतीं व भरते दोन आदि करून पंचवीस तीस प्रकार करावे. एक दुसरी चमत्कारिक कोशिंबिरी करावी. विचारून वाढावी. मीठ धुवून पांढरे बारीक करावे. हारीने एकास एक न लागता हिरव्या, पिवळ्या, लाल, काळ्या रंगाचे अनुक्रमाने मध्ये थेंब न पडता, गलगल न करता वाटोळ्या वाढाव्या. हात धुवून मग दुसरी कोशिंबिर वाढीत जावी.

" भोजन समयी समया खाशाचे पंगतीस दोन पात्राआड एक व वरकड पंगतीस चार पात्राआड एक याप्रमाणे उजळ समया वाती उजळून चांगल्या कोरड्या न रहाता भिजवून तेल निवळ पांढरे असेल ते घालून पात्रावर न पाडता तजविजीने झाऱ्यानी समयावर घालावे. रुप्याच्या समया खासे पंगतीस मांडाव्या. त्याजवर तेल-रुप्याचे झाऱ्यानी घालावे गुलदानानी गूल काढावे."

" सदहू साहित्य आचारी चांगले शहाणे लावून स्वयंपाक चांगला करावा. पात्रांचा अदमास पुसोन घेऊन दोन प्रहरात्र भोजने होत अशी तजवीज करावी. लोणची भाज्या वगैरे उष्ण रसाच्या, एक सारख्या हारीने वाटोळ्या वाढाव्या. एकास एक लावू नये. आंबटी, सांबारे, वरण, क्षीर यांचे थेंबटे मध्यें पडू नयेत. तूप रुप्याचे तोटीच्या कासंड्यानी वाढावे. प्यावयाचे पाणी गाळून शीतल करावे. वेळा, वाळा कापूर लावून उदवून तें सिद्ध करावे. सर्वांस भोजनसमयीं व फराळसमयीं देत जावे. भोजनोत्तर आंचवावयास उष्ण पाणी व हातास लावावयास साखर व दात कोरावयास लवंगा याप्रमाणे देत जावे.

" फराळाचे सामान लोणची पाच प्रकारची व पापड, सांडगे, कोशिंबिरी दहा प्रकारच्या. पक्कान्नें व लाडू, पोहे, आंबेमोहोर बारीक भात व खानदेशातून नवे पोहे आणवून ते व मानबरात लाह्या, खारीक, खोबरे, खजूर, बदाम, पिस्ते, नारळ मेवा वगैरे. मेवामिठाई. दही, दूध, तूप साजूक व मध्यम. मुरंबे.

" विडे बांधणे ते हिरवे खर्ची पानांचा व बाजूचा सात पानांचा बांधावा, पिकल्या पट्ट्या, बाजूच्या सात पानांच्या, सुपारीचे पानांची गुंडी उभी घालून भरदार चांगल्या बांधाव्या. कुलपी विडे, केळीची पाने लावून, दहा पानांचा एक बारा पानांचा त्यांत गंगेरी दोन पाने घालीत जावी. त्यास दुकाडीची खूण करावी. सुपारी फुलबर्डी वगैरे चांगली पाहून धुवावी. त्यापैकी तबकात मोकळी घालावयाची त्यास केशराचे पाणी देऊन गुलाब घालून रंगदार करावी. कांहीं रोठा-सुपारीचे फूल पाडून ठेवावे. चिकणी सुपारी नुस्ती व खुषबोईदार करून ठेवीत जावी. चुना केशरी व साधा पांढरा सफेत खासा सभेंत तबकात ठेवण्याकरितां करवा."

— **पेशवेकालीन महाराष्ट्र**

शाळाकॉलेजांतल्या मुली मला पाहून फिदीफिदी हंसत. कधी कधी स्त्रियांची मला भीती वाटे. एखादी स्त्री जराशीहि जवळ आली तरी माझ्या हृदयाचें ठोके जलद गतीनें पडू लागत. त्यांचा वेग इतका वाढे की सारे शरीर संपून नुसते टकठक वाजत रहाणारे हृदयच शिल्लक उरे. स्त्रीचा साधा ओझरता स्पर्शहि अजुन मला झाला नव्हता. स्त्रीच्या जवळ जाण्याची मलाच भिती वाटे. जितकें जवळ जावेसें वाटे तितका मी दूर पळे.

अशा अशांत, ज्वरपीडित अवस्थेंत दिवस भ्रमांत तरळत चालले होते. काम करतांना अचानक माझें लक्ष उडे. स्त्रीचा शब्द, स्त्रीचा आकार, स्त्रीचा श्वास पुढ्यांतल्या पानापानावर जागा होऊन कृष्णसर्पासमान वळवळत फिरूं लागे. कधी तो उष्ण श्वास माझ्या मानेला भाजीत पसरीत जाई. कधी हातांतला टाक हा स्त्रीचा हात असल्याचा मला भास होई. मी तो टाक वट्ट धरून ठेवी. समोरचा खांब हा स्त्रीचा चेतनामय देह वाटे आणि मी त्या खांबावर मस्तक टेकी. ह्या साऱ्या खोट्या फसव्या आयुष्याची मला चीड आली. माझ्या समोर घास टांगला होता आणि मी जीभ बाहेर काढून नुसताच आ वासून बसलो होतो. गाढव, बेअक्कल, भ्याड ! शेवटीं बावळटच ! नाहीं...मी बावळट नाहीं...मीहि पुरुष आहे...माझ्या अंगांतहि गरम रक्त सळसळत आहे...

स्त्री माझ्याकडे येत नव्हती तर मलाच स्त्रीकडे जाणे भाग होते. निदान एक जागा तरी अशी होती कीं ज्या ठिकाणीं जिना चढून मी स्त्रीकडे हक्कानें जाऊ शकत होतो. मी मर्द होतो की मुर्दाड होतो. ह्याचा विचार न करता ती स्त्री फक्त स्वतःची किंमत मोजून घेऊन मला तृप्त करूं शकत होती. खूप दिवस मी विचार केला. किती पैसे लागतील ह्याचा हिशोब करीत बसलों. नक्की जागाहि हेरून ठेवली. दिवसहि निश्चित ठरविला. आणि अखेर एका काळोख्या रात्री त्या बदनाम गल्लींत घुसलो. रस्त्यावरची बत्ती मिणमिणत होती. इमारतीच्या खिडक्या उघड्या होत्या पण पडदे सोडलेले होते. एका खिडकीचा पडदा मात्र जरासा सरकवलेला होता. त्या फटींतून दिसणारें स्वस्त दृश्य आसुसलेल्या नजरेनें टिपून घेत मी इमारतीसमोरच्या पुलाखालीं अंधारांत लपून उभा राहिलों होतों. आता फक्त काही अंतर चालून जाण्याचाच प्रश्न होता. काही पायऱ्या चढण्याच काय तो अवकाश होता. फक्त एक कडी वाजविण्याची आवश्यकता होती. माझ्या आयुष्यांतला तो क्षण आता जवळ आला होता. दबकत दबकत मी एकेक पाऊल पुढें टाकूं लागलो. भुकेनं पेटलेला चित्ता जसा समोर दिसणाऱ्या हरणाकडे लालचावून सावधपण जातो तसा मी स्त्रीकडे चाललों होतो. रस्ता ओलांडून मी इमारतीजवळ आलो. हळुहळु जिना चढू लागलो. दारापर्यंत जाऊन पोचलों......आणि आल्या पावलींच जीव मुठींत घेऊन उलटा पळत सुटलो.

हेंहि अखेर जमलें नाहीं. भ्याड बेवकूफ, नादान नालायक...... मी स्वतःलाच लाख शिव्या मोजल्या. अरे, जगांतल्या कुठल्याहि खत्रुड इसमाला जें विनासायास साधलें असतें तें इतका विचार करून आणि इतके बेत आखून तुला जमलें नाहीं ना ! तूं जगण्याला नालायक आहेस......तुला गोळी घालून लूथ भरलेल्या कुत्र्यासारखें ठार मारले पाहिजे......स्वतःला दूषणें देत, स्वतःचा नाना परीनें

अनुक्रमणिका

धिक्कार करीत मी जीवनाचा रस्ता हातपाय गळून पडलेल्या महारोग्याप्रमाणें खुरडत खुरडत आक्रमीत होतो.

राजरोसपणें मिळणें शक्य नव्हतें, भीक मागून मिळविण्याचीहि धमक नव्हती......तें अखेर लबाडीनेंच हस्तगत करावयास हवें होतें. मी नुसताच विचार करीत भ्रमत फिरत होतो. एके दिवशीं फिरता फिरता मी रस्त्यावर अचानक थबकलों. कुठल्या तरी चित्रपटगृहासमोरचा रस्ता होता तो. चित्रपट नुक्ताच सुटला होता. रस्त्यावर घरीं परत जाणाऱ्या प्रेक्षकांची तुफान गर्दी उसळली होती. मी गर्दीपासून लांब उभा होतो. अचानक एका दृश्यावर माझे डोळे खिळले. गर्दीमध्यें दोन तरुण मुली अगतिक होऊन अडकल्या होत्या आणि दोन तीन मवाली त्यांना मध्यें कोंडून घालून त्यांच्या देहाचा अप्रत्यक्ष उपभोग निर्लज्जपणें घेत होते. त्या मुली भ्याल्या होत्या. कडवट घोट घेतल्याप्रमाणें त्यांचे चेहरे केविलवाणे झाले होते. त्या मवाल्यांच्या चेहऱ्यावर मात्र एक क्रूर समाधान झळकत होते. क्षणभर मला वाटले, गर्दीत घुसावे, त्या मवाल्यांशीं मारामारी करावी आणि त्या मुलींची सुटका घडवावी. पण मी तसाच मख्खपणें उभा राहिलों. तें दृश्य बघता बघतां अचानक माझ्या मस्तकांत तांबडीकडक वीज लकाकून गेली. चळल्याप्रमाणें मीहि त्या गर्दीत घुसलों. गर्दीच्या थेट पोटांत शिरलो. आणि...... अखेर स्त्रीवर मी विजय मिळवला होता. मला ती शरण आली होती. मी तिला अधाशासारखा हुंगीत होतो, चाटीत होतो आणि ती व्याकुळ होऊन माझी करुणा भाकीत होती. माझ्यापुढें ती दुबळी ठरली होती. तिचा अखेरपर्यंत मी पिच्छा पुरविला. तिची पाठ मी शेवटपर्यंत सोडली नाहीं. स्त्रीनें माझ्यावर कधींच दया केली नव्हती तर मी काय म्हणून तिची पत्रास बाळगावयाची ?

समाधानाचा, तृतीचा, मनःशांतीचा एक गटाररस्ता अखेर मला सांपडला होता. रस्त्यानें चालता चालता मी निःशंकपणे त्या गटारांत उडी घेऊं लागलो. गर्दीचा वास घेत मी रिकाम्या वेळीं रस्त्यातून फिरत राही. गर्दी दिसली की माझें मस्तक बेभान होई, कपाळावरली शीर ताडताड उडूं लागे आणि नकळत घरंगळत मी गर्दीत जाऊन मिसळे. गर्दीत स्त्री संपूर्ण माझी होऊ शकत होती. ह्या कोंडींत मी तिला पकडूं शकत होतो आणि माझ्या देहाचा कंड शमवीत होतो. गर्दी असे तोपर्यंत मी धूर्तपणें हातचलाखी करून घेई. गर्दीच्या क्षणावर स्वार होऊन मी बादशाही थाटाचा उपभोग घेई. गर्दी कधीं संपूं नये असे मला वाटे. गर्दी संपत आली कीं मला थकल्यासारखे वाटे, माझे त्राण गळत जाई आणि गर्दी ओसरताच लाटेनें दूर फेकलेल्या गरम वाळवंटावरल्या मासळीसारखा तडफडत मी रस्त्याच्या कडेनें अंग चोरून चालूं लागे. गर्दीपुरता मी जीवंत होई—बाकी मेलेलाच.

आणि आतां......आतां त्याचाहि वीट आला आहे. शेवटी कुजलेल्या प्रेताला टोचणारें गिधाडच ! शिकार करणारा गरुड नव्हेच......कधीच नव्हता आणि कधी होईल की नाहीं कुणास ठाऊक ! ही आंत पेटलेली आग मात्र विझत नाहीं. अण्णाला कुठें ठाऊक आहे हें सारें ! तो फक्त तिटकाऱ्यानें म्हणतो—बावळट कुठचा ! माझें लग्न करून द्यायला तो कुठें तयार आहे ? सांगूं का मी त्याला—कीं इतका सारा पापाचा डोंगर रचूनहि माझी लग्न करण्याची इच्छा अजुन जिवंत आहे, अजुन जळते आहे, मला अजुनहि पोळते आहे. • • •

ज्ञानकोशकार डॉ. केतकर यांच्या पत्नी

## श्री. शी ल व ती के त क र

म्हणजे पूर्वाश्रमीच्या मिस् कोहेन—यांचें बालपण आणि तारुण्य युरोपांतच गेलें.—एका विक्षिप्त-हिंदी विद्वानाची पत्नी म्हणून त्यांनीं १९१८ सालीं भारतांत प्रवेश केला.

त्यांची ही मुलाखत म्हणजे, चाळीस वर्षापूर्वीचा महाराष्ट्र एका पाश्चिमात्त्य विदुषीला कसा दिसला याचें उद्बोधक दिग्दर्शन.



# कालचा महाराष्ट्र

नि वे द क

**गो विं द त ळ व ल क र**

"कायरे, काल सुटी घेतली होतीस तर? मग होळीचा नाचायला नाहीं आला! होळीचं नाचायचं नांहीं!" ज्ञानक्रोशकार डॉ. केतकर यांच्या पत्नी श्रीमती शीलवतीबाई केतकर परवां होळीच्या दिवसांत आपल्या नोकराला विचारीत होत्या. हल्ली होळीच्या सणांत बालेलोक, रामा गडी, फारसे नाचत नाहींत याबद्दल त्यांच्या बोलण्यांत विषाद दिसला. मी ज्या उपनगरांत राहतो तेथें रामा गडी, आगरी लोक अजून होळीच्या दिवसांत नाचत असले तरी हें प्रमाणहि कमी झालें असल्याचें मी शीलवतींना सांगितलें व यावरून मग येथील समाजांत पडत चाललेल्या फरकाकडे आमच्या संभाषणाची गाडी वळली.

शीलवतीबाई ४० वर्षें भारतांत आहेत, आणि विशेष म्हणजे महाराष्ट्रांत आहेत. १९१९ च्या डिसेंबर मध्यें त्या भारतांत आल्या. पूर्वाश्रमीच्या मिस कोहेन या लंडनमध्यें राहात होत्या. त्यांचें घराणें मुळचे जर्मनींतील पण नंतर कोहेन कुटुंब इंग्लंडमध्यें स्थायिक झाले. या सर्वच कुटुंबास परराष्ट्रांबद्दल विलक्षण आकर्षण होतें.

ग्रंथांवरून मिस कोहेन यांची विशेषतः भारताबद्दल कांहीं मतें बनलीं होतीं. भारतांत अनेक ठिकाणीं ऋषि मुनींचे आश्रम असतील असें मिस कोहेन यांना वाटत होतें. भारताचें व डॉ. केतकरांचें आकर्षण अशा दुहेरी आकर्षणानें त्या भारतांत आल्या. त्यांचीं १७ वर्षें पुण्यांत गेलीं व बाकीचीं जवळजळ २३ वर्षें मुंबईंत गेलीं आहेत. कांहीं महिने त्या आपल्या मुलीबरोबर व जामाताबरोबर कलकत्त्यांत राहात होत्या. पण ४० वर्षांच्या त्यांच्या येथील वास्तव्यापैकीं बहुतेक सर्व वर्षें पुण्या मुंबईंत गेलीं आहेत.

या चाळीस वर्षांत शीलवतीबाईंना येथील समाजांत अनेक बदल घडून आलेले दिसत आहेत. त्या प्रथम लंडनहून येथें १९१९ मध्यें पुण्यांत आल्या तेव्हां त्यांना कांहींसा धक्काच बसला. लंडनमध्यें रात्र पडली कीं विजेच्या दिव्यांचा झगझगाट होत असे या उलट त्याकाळांत पुण्यांत संध्याकाळनंतर अंधार होई. नगरपालिकेचे मिणमिणते दिवे दूरदूर अंतरावर असत. या दिव्यांच्या प्रकाशामुळें अंधारच अधिक उठून दिसत असे. घराघरांत कंदील असत आणि स्वयंपाक घरांत दिवटी किंवा पणती जळत राहायची. चुलींतील लांकडें पेटल्यानें जो उजेड पडे तो अर्थातच या दिवट्यांपेक्षां अधिक मोठा असे. कांहीं ठिकाणीं मेणबत्त्याहि जळतांना दिसत. अशाप्रकारें रात्र पडली कीं खरोखरीच अंधाराचें साम्राज्य पसरें. जो कांहीं उजेड पडे तो उत्साहभंग करणारा असावयाचा. शीलवती लंडनमध्यें होत्या तेव्हां येथल्यासारखा सूर्यप्रकाश त्यांना पहावयास मिळत नव्हता. पण दिवसाचा उजेडाचा अभाव. लंडन शहर रात्रीं दिव्यांच्या प्रकाशांत न्हाऊन निघत असल्यानें भरून निघे; तर येथें दिवसां सूर्याचा प्रकाश भरपूर आणि रात्र पडल्यावर अंधार अशी स्थिती होई. शीलवतींना म्हणून रात्र पडली कीं पुण्याचें वातावरण कांहींसें भयप्रद वाटावयाचे. रस्त्यांनीं जातांना रात्रीच्यावेळीं त्यांची पंचाईत उडत असे. समोर येणारा माणूस दिसणें मुष्कील होई आणि मग त्या माणसाच्या अंगावर त्या आदळत. विशेषतः शुक्रवारीं लंडनला पत्रें पाठविण्यासाठीं त्या घाईघाईनें जात तेव्हां असे प्रसंग वारंवार घडत. अशा त्या अंधारांत दुकानांत जाऊन खरेदी करणें कठीण होई. देवळांत अगदीच मिणमिणता प्रकाश असे. त्यामुळें तेथील वातावरण खिन्न, उदास आणि कांहींसें अद्‌भुत वाटत असे. 'शीलवतींना' हा अनुभव नवा व विलक्षण होता.

तथापि कांहीं घरांतून पेट्रोमॅक्सच्या बत्त्या जळत व तेथें झगझगाट असे. शीलवतींनीं हीं घरें पाहिलीं तेव्हां त्यांत श्रीमंत लोक राहात असावेत अशी त्यांची समजूत झाली. पण नंतर त्यांना कळलें कीं पेट्रोमॅक्सच्या बत्त्या लागलेल्या घरांत वेश्या, नायकिणी राहतात ! किंबहुना असा झगझगाट असलेलीं घरें हीं संशयास्पदच मानलीं जावयाचीं ! पण आतां ? आतां हा सर्व अंधार नाहींसा झाला आहे. पुण्यामुंबईंत विजेचा अगदी लखलखाट सध्यां होत असतो. घरांत व दुकानांतून ट्यूब लाइट असतात. पाट्या निऑन लाइटस्‌च्या आहेत आणि रस्त्यावर मर्क्युरी दिवे जळत आहेत. कंदिलानंतर गॅसचे दिवे येतील असें शीलवतींना वाटलें होतें पण गॅसच्या दिव्यांऐवजीं एकदम विजेच्यां दिव्यांच्या युगांत प्रवेश झाला. आतां ज्या घरांत झगमगाट आहे तें संशयास्पद वाटत नाहीं उलट अंधाऱ्या घरांत संशयास्पद व्यवहार चालण्याची शक्यता आहे.

लोकांच्या पोशाखांतहि आतां फरक पडला आहे. लहान मुलामुलींचे पोपाख खास भारतीय वा महाराष्ट्रीय असें कांहीं राहिलेले नाहींत. अनेक पाश्चात्य देशांतील मुलामुलींच्या पोशाखासारखेच हेहि पोशाख आहेत. पूर्वीपेक्षां ते अधिक सुटसुटीत व शोभिवंत आहेत. स्त्रियांच्या पोशाखांत विशेष फरक पडला आहे. विटक्या रंगाचीं पातळें पूर्वीं दिसत. आतां अनेक प्रकारच्या साड्या निघाल्या आहेत. ज्या रंगांच्या साड्या पूर्वीं नेसल्या असतां लोकांना संशय वाटत असे तेच रंग आतां लोकप्रिय व प्रतिष्ठित झाले आहेत. त्यामुळें घरांत वा समाजांत रंगांचें मनोहर प्रदर्शन दिसते आणि चित्ताला आल्हाद वाटतो. लोकांत रंगसंगतीची कल्पना बरीच रूढ झाली आहे.

घरांचा प्रश्न, बेकारी वगैरेमुळे मोठमोठीं कुटुंबें आतां जवळ जवळ उरलेलीं नाहींत. त्यामुळें कुटुंबियांत अधिक संघटन वाढत आहे आणि सुटसुटीत संसार करण्याकडे लक्ष आहे. मागे नवराबायकोंनीं फिरावयास जाणेंहि चर्चेचा विषय होऊन बसत असे पण आतां विवाहापूर्वींच फिरावयास चाललेलीं अनेक जोडपीं दिसतात पण त्याची चर्चा होत नाहीं. विधवेचा पुनर्विवाह हा एक काळ केवढा मोठा प्रश्न होता पण आज तो जवळजवळ नगण्य झाला आहे. आजच्या तरुण पिढीला बऱ्याच मोकळ्या वातावरणांत वावरावयास मिळते. चाळीस वर्षांपूर्वीं शीलवती येथें आल्या तेव्हां असें स्वातंत्र्य त्यावेळच्या तरुण पिढीला लाभत नव्हतें. आहार, विहार यांत बराच बदल झाला आहे. दिवाणखान्यांत बदल झाला आहे. त्याचप्रमाणें स्वयंपाकघराचें स्वरूप पालटलें आहे. पाटावर मांडी घालून भोजन करण्यापेक्षां टेबलावर जेवण्याकडे वाढता ओढा आहे.

शारीरिक बदलहि झाले आहेत. मुलें मुलीं अंगापिंडानें चांगलीं दिसतात. लहान मुलांची प्रकृति सुदृढ असते. त्यांची आरोग्यविषयक काळजीहि अधिक घेतली जाते. एक पिढीपूर्वीपेक्षां आजची पिढी उंचीनें अधिक मोठी दिसते या पिढीला ज्ञान प्राप्तीचीं किती तरी साधनें उपलब्ध झालेलीं आहेत.

शीलवतीबाईचें काम हें बहुतांशीं एकलकोंडे पणानें करण्याचें असल्यामुळें त्यांना वाङ्मय कला वगैरे लोकांत फारसें मिळण्याची आवश्यकता कधीं भासली नाहीं. सांस्कृतिक कार्य करणारा वर्ग येथें कितीहि मोठा असला तरी शीलवतींचा त्यांच्याशीं फारसा निकटचा संबंध आलेला नाहीं. त्यामुळें येथील सांस्कृतिक जीवनाशीं त्यांचा कोणता ग्रह झालेला आहे हें त्या सांगू शकत नाहीं. मराठी वाङ्मयाचा व त्यांचा फारसा परिचय नाहीं. आजची मासिकें व पुस्तकें चांगली छापलेलीं दिसतात. सुबक छपाई एवढेंच आतां वैशिष्ट्य राहिलें आहे असें मी म्हटलें. तेव्हां त्या फक्त हंसल्या पण ज्या विषयाशीं संबंध नाहीं ह्यावर मत ठोकून देण्याइतक्या त्या ' विदुषी ' नाहींत.

हे जे वेगवेगळे फरक गेल्या चाळीस वर्षांत पडले आहेत ते सर्वच वाईट आहेत वा चांगले आहेत असें शीलवतीबाई म्हणत नाहींत. कांहीं बदल हे केवळ फॅशन, टुम म्हणूनहि झाले असतील पण सामाजिक उत्क्रांतींत हें सर्व अपरिहार्य आहे असेंच त्यांचे मत आहे. शिवाय जीवनांत मग तें व्यक्तीचें असो वा समाजाचें असो—जें घडेल तें तसेंच्या तसेंच स्वीकारावें अशी त्यांची धारणा आहे. याचा अर्थ त्या सर्वस्वी दैववादी आहेत असा नाहीं. त्या कर्मवादी आणि कार्यमग्न आहेत.

हें जीवन कितीतरी समृद्ध आहे आणि किती तरीं घटनांनीं तें भरलेलें आहे. त्यांच्या जीवनावर दृष्टिक्षेप टाकलांत तर अनेक ' खुणेचे दगड ' दिसून येतात. अगदी तरुण वयांत त्यांनीं भारतांत येण्याचा आणि येथें स्थायिक होण्याचा निर्णय घेतला. येथें आल्यावर व्रात्यस्तोमविधि होऊन हिंदु समाजांत त्यांना प्रवेश देण्यांत आला. ज्ञानकोशकार केतकर यांच्यासारख्या अलौकिक बुद्धीच्या व प्रतिभेच्या पंडिताशीं त्यांचा विवाह झाला आणि डॉ. केतकर व त्यांचें सफल सहजीवन मग सुरू झालें. डॉक्टरांना त्यांची कितीतरी मदत होई. भावजीवनांत साथ देणारी सहचरी लाभू शकेल पण बौद्धिक जीवनांत साथ देणारी सहचरी लाभणें हें दुर्लभ आहे. शीलवतीबाई डॉक्टरांच्या बौद्धिक जीवनांत त्यांची शक्यतो साथ करीत होत्या. त्यांना ज्या युरोपियन भाषांचा परिचय आहे त्या भाषांतर करणें वगैरे साहाय्य त्या करीत. ज्ञानकोशाच्या कामीं त्यांनीं आपल्या या भाषांतून भाषाज्ञानाचा उपयोग वेळोवेळीं केला होता. या अनेक भाषांतील ग्रंथ त्या डॉक्टरांना वाचून दाखवीत, कांहींचा संक्षिप्त अनुवाद करून देत, टिपणें तयार करीत वा त्या ग्रंथांतील कांहीं निवडक भागांची माहिती करून देत. डॉक्टरांजवळ ज्ञानाचा प्रचंड सांठा होता आणि त्यांना अलौकिक प्रतिभा लाभली होती पण त्यांची ज्ञानपिपासा कधींच कमी आली नाहीं. त्यांच्या या पिपासेचें शमन करण्याच्या कामीं शीलावतीबाईंचा केवढा उपयोग होत असे !

ज्ञानमय जीवन जगणाऱ्या दंपतीस ज्ञानकोश पुरा झाल्यावर केवढा आनंद झाला असेल याची कल्पना करतां येण्यासारखी आहे. आणि आजहि ' प्राचीन महाराष्ट्र ' च्या पहिल्या खंडाचें प्रकाशन हा त्यांना अतीव आनंदाचा प्रसंग वाटतो.

एवढ्या आयुष्यांत शीलवतींना अनेक नामवंत व्यक्ती पहावयास मिळाल्या. पण लोकमान्य टिळकांविषयीं त्या विशेष आत्मीयतेनें बोलतात. शीलवतीबाई लंडन येथें एका शाळेंत शिक्षिका होत्या तेव्हां लोकमान्य लंडनला आले असतां शीलवतींच्या आग्रहावरून शाळेच्या मुख्याध्यापिकेनें टिळकांना शाळेला भेट देण्याचें आमंत्रण दिलें; आणि लोकमान्यानीं ते स्वीकारलें. लोकमान्यांच्या

अनुक्रमणिका

बरोबर त्यांचे सहकारीहि बालवर्गांत आले होते. मुलांनीं टिळकांशीं वाटेल तशी दंगामस्ती केली. कोणी मांडीवर बसले. कांहींना टिळकांची पुणेरी पगडी हा कुतुहलाचा विषय होऊन बसला व म्हणून त्यांनीं टिळकांच्या डोक्यावरची पगडी काढून हें विलक्षण शिरस्त्राण आहे तरी कसे म्हणून वर खालीं करून् बघितले. गलिव्हरला बारक्या दोऱ्यांनीं बांधून मग लिलीपूट त्यांच्या अंगावर चढले पण येथें—हे लिलीपूट या गलिव्हरच्या अंगाखांद्यावर चढत होते. ब्रिटिश सिंहाची आयाळ ओढणाऱ्या या भारतीय नरकेसरीच्या मिशाही ओढण्यास त्या गोऱ्या बाळांनीं कमी केलें नाहीं. आणि भारतीयांच्या केसानाहि धक्का लागूं नये म्हणून सदैव जागृत असलेल्या या बाळ गंगाधरांनीं या गोऱ्या बाळांच्या लीला चालू दिल्या. ते त्या मुलांना वाटेल तसे खेळूं देत होते. हें पाहून शाळेच्या मुख्याध्यापिकेला शिस्त बिघडली म्हणून राग येत होता, पण टिळकांना गंमत वाटत होती. शीलवतींना या पुरुषसिंहाच्या या वर्तनामुळें गंमत वाटली. त्यानंतर पुण्याला आल्यावर डॉक्टर केतकरांच्याबरोबर टिळकांच्या व त्यांच्या अनेकवेळां भेटी झाल्या.

इतिहासाचार्य राजवाडे हे दुसरे एक विद्वान होते. जेव्हां ते डॉक्टरांच्या शेजारीं कांहींकाळ राहात होते तेव्हां शीलवतींना त्यांना भेटण्याचे कांहीं प्रसंग आले. राजवाड्यांची प्रकृति त्यावेळीं बरीच खालावली होती तेव्हां कांहीं पथ्याचे पदार्थ शीलवतीबाई करीत आणि डॉक्टर केतकर ते पदार्थ राजवाड्यांना नेऊन देत. राजवाड्यांच्या रागीट स्वभावाबद्दल अनेक कथा शीलवतींनी ऐकल्या होत्या पण खुद्द त्यांना वेगळाच अनुभव आला. राजवाडे त्यांच्याशीं अतिशय सौजन्यानें वागत.

पण टिळक, केतकर, राजवाडे यांचा काळ गेला आहे. शीलवतीबाई तेव्हांहि लोकांत कधीं मिसळत नसत व आजहि त्या तशा मिसळत नाहींत. याचा अर्थ त्या माणूसघाण्या आहेत असा नाहीं. पण उगाच चारचौघांना जमवून गप्पा मारीत बसण्याचा त्यांचा स्वभाव नाहीं. त्याचप्रमाणें व्याख्यानें देण्याची वा ऐकण्याची त्यांना हौस नाहीं. अनेक संस्थांकडून त्यांना व्याख्यानासाठीं आमंत्रणें येत पण आपल्या वक्तृत्वशक्तिबद्दल त्यांना खात्री नाहीं म्हणून त्या भाषणें देत नाहींत. साहजिकच समाज, त्यांतील बुद्धिजीवी वर्ग यासंबंधीं त्या कोणताच अंदाज बांधावयास तयार नसतात. परंतु समाजांत चाललेल्या घडामोडींची त्यांना चांगली कल्पना आहे. संगीत व वाचन याची त्यांना मनापासून आवड आहे आणि म्हणून नाट्य चित्रपट आणि ग्रंथ यासंबंधीं त्या मोकळेपणानें बोलतात. दामोदर हॉलवरील नाटकाच्या पाट्या पाहिल्यावर तीस वर्षांपूर्वी पुण्याला पाहिलेल्या मराठी नाटकाची त्यांना आठवण येते आणि नवीं नाटकें येतात कीं नाहीं असा त्यांना प्रश्न पडतो. आणि मग जुन्या जमान्यांतील बोलपट त्यांना आठवूं लागतात. व्ही. शांताराम यांच्या डॉ. कोटणीसचें इंग्रजी रुपांतर करतांना शीलवतीबाईंची मदत घेण्यांत आली होती. त्यामुळें चंदेरी दुनियेचें दर्शन त्यांना जवळून झालें आहे. रसिक, चोखंदळ प्रेक्षकांचें आपल्या चित्रपटांबद्दल जें मत आहे तेंच शीलवतीबाईंचें आहे.

• म्हणून पाथेर पंचली या बोलपटाचा त्यांच्या मनावर विलक्षण परिणाम झालेला आहे. बंगाली चित्रपटांची ही परंपरा त्यांना अभिनंदनीय वाटली तर आश्चर्य काय ?

ज्या प्रमाणें सामाजिक चळवळीची चर्चा करण्याची शीलवतींची तयारी नसते त्याप्रमाणें राजकारणावरहि बोलण्याचें त्या टाळतात. पण म्हणून राजकीय घडामोडीं विषयीं त्या अज्ञानांत नाहींत. न्यू स्टेटसमन् मधील लेख इतकेंच नव्हे तर व्यंग चित्राचाहि उल्लेख त्यांच्या संभाषणांतून येऊन जातो. डॉक्टर केतकरांप्रमाणेंच आपलें ज्ञान व आपली विद्वत्ता त्या अगदी सहजपणें पेलतात. ज्ञानाचें वृथा प्रदर्शन त्या कधींच करीत नाहींत. त्यांचा वाचनाचा हव्यास विलक्षण आहे. वस्तुतः त्यांचें आतां उतारवय झालें आहे. पण त्यांचा उत्साह, काम करण्याची व वाचनाची हौस दांडगी आहे. युसिसच्या ग्रंथालयांतील त्यांची वारी कधीं चुकत नाहीं. कांहीं जर्मन तांत्रिक विषयांचे भाषांतर करण्याचें त्यांचें काम चालू असते आणि त्या सारख्या वाचत असतात व टिपणें काढीत असतात. डॉक्टर केतकरांच्या प्राचीन महाराष्ट्र या ग्रंथाचा उरलेला भाग प्रसिद्ध होत आहे त्याचें काम चालूच आहे. पण हा ग्रंथ समग्र प्रसिद्ध करणें ही त्यांची मनीषा आहे. डॉक्टर केतकरांचें वाङ्मयीन स्मारक हेंच चिरकाल टिकणार आहे. आजहि डॉक्टरांना पूर्णपणें ओळखलें गेलें नाहीं असेंच त्या समजतात. डॉक्टरांचें विचारधन जपून ठेवणें व भाविपिढ्यांना उपलब्ध करून देणें हें आपलें कर्तव्य मानून त्या व त्यांची सुविद्य कन्या प्रकाशनाचा उद्योग झेपेल तसा करीत असतात.

एवढा व्याप सांभाळूनहि शीलवतींचा आनंदीपणा व ज्ञानलालसा बिलकूल कमी झालेली नाहीं. अनेक ग्रंथांचा त्यांच्या मनावर परिणाम झालेला आहे पण अशाप्रकारें प्रभावी ठरलेलें ताजें पुस्तक म्हणजे पास्तरनाकची डॉ. झिवागो ही कादंबरी, हें होय. शीलवतींना या कादंबरीनें चांगलाच मोह घातला आहे. त्यांतील रशियन सृष्टीचीं वर्णनें, मानवी जीवनाचें घडविलेलें दर्शन हीं सर्व त्यांना अविस्मरणीय वाटतात. परवांच्या आमच्या भेटींत डॉ. झिवागोबद्दल आम्ही कितीतरी बोलत होतो. युरोपियन लोक प्रायः बरेच हातवारे, हावभाव करून बोलतात. शीलवती त्यास अपवाद नाहींत. डॉ. झिवागोंत बर्फ पडल्याचीं कितीतरी वर्णनें आहेत. त्यांचा उल्लेख करतांना जणूं काय त्यांच्या व्हिन्सेन्ट रोडवरच्या घरांतच बर्फ पडत आहे असा भास त्यांच्या हावभावावरून होत होता.

ऋषि मुनींचे आश्रम भारतांत असतील अशी त्यांची रोमॅन्टिक कल्पना तरुणवयांत होती. एका ज्ञानमहर्षींची सहचारिणी म्हणून त्यांनीं येथें आपल्या जीवनांतील सतरा वर्षें काढलीं आणि त्या आजहि ज्ञानाच्या उपासनेंत गर्क आहेत. सत्कार, भाषणें, दौरे, मुलाखती यापासून त्या पूर्णपणें अलिप्त आहेत. त्या आतां वयोवृद्ध आहेत तशा ज्ञानवृद्धहि आहेत. गार्गीमैत्रेयींची परंपरा त्या चालवित आहेत. त्यांनीं हिंदुधर्म स्वीकारलेला नाहीं. व्रात्यस्तोम विधि हा केवळ हिंदु समाजांत त्यांना प्रवेश देण्यासाटीं डॉक्टर केतकरांनीं घडवून आणला होता. तसें पाहिलें तर त्या कोणत्याहि एखाद्या धर्मानें पालन करीत नाहींत. ज्ञानोपासना हाच त्यांचा धर्म आहे. फोर्ट विभागांत त्या कांहीं वेळां तुम्हांला दिसतील. कधीं पुरोहित मध्यें दुपारचें भोजन करतांना आढळतील. त्यांच्या दादरच्या निवासस्थानांत त्यांची येण्याची वेळ नक्की नसते. पण त्या मुंबईतील कोठल्यातरी ग्रंथालयांत कार्यमग्न असलेल्या हटकून आढळतात. युरोपियन पोषाखांतील ही गार्गी व मैत्रेयीच आहे. तेव्हां ग्रंथालयाखेरीज दुसरें योग्य ठिकाण कोणतें असणार ? • •

## झुंजवीता ही कुरंगी



झुंजवीता ही कुरंगी काय चितरंगासवें
नयन नयना छेडिती, अन् झेप घेती पारवे
चोरिचा आनंद होई चोरिल्या चित्तासही
वाटतो बाई हवासा आवडीचा त्रास ही
मख्मली मस्तीत काया हालते अन् डोलते
प्रीतिची भाषा जगाशीं मुग्धतेनें बोलते
नेहमी नाहीं म्हणावें, आपणाला जें हवें
जे हवें बाई मनाला तें मुळीं ना बोलवे
चाल बेपर्वा तुझी हृदयावरोनी चालता
रंगविली पावलें तो रक्तरंगीं आळता
बोचती दर्भांकुराचे काय काटे कोवळे
वाकतां धुंदींत हिर्वी लूट डोळ्यांना मिळे

ललितांग यौवनसुंदरी—खिळतील नयनांचे थवे
तव भीरुतेतिल चारुता निरखीत गे सुखसंभवे
मीच बाई हारले ग जिंकला घायाळ तो
हांसुनी ओठांत कैसा जीव माझा जाळतो

— राजा वढे

# फार्गो

## डीझेल्स

## राष्ट्राच्या सेवेसाठीं

फार्गो डिझेल ट्रक निरनिराळ्या विकास योजनांच्या ठिकाणीं त्यांना नेमून दिलेल्या कामापेक्षां कितीतरी अधिक कामगिरी बजावीत आहेत, याचें कारण त्यांची मजबूत रचना आणि बनावट तसेंच दर फेरीमागें अधिक वजन वाहून नेण्याच्या शक्तीमुळें येणारा कमी खर्च हें होय. कितीही वजनी माल असो किंवा रस्ता खूप अवघड असल्यामुळें तो माल वाहून नेण्याचें काम कितीही कठिण असो, हे ट्रक सेवा, कामगिरी आणि काटकसर या बाबतींत पहिल्या दर्जाचे सिद्ध झाले आहेत




**फार्गो** डीझल ट्रक

**आतां नवीन, अधिक शक्तिशाली आणि खर्च कमी येणाऱ्या एंजिनासह मिळतात**

प्रगतिशील कारखानदार

### दी प्रीमीअर ऑटोमोबाइल्स लिमिटेड
मुंबई



SISTA'S-PAL-306-MAR.

**आपल्या नजीकच्या डीलर्सना भेटा अगर लिहा.**










*आपल्या मनांत भरलेल्या पोरीशीं लग्न कसं जमवायचं*

*वात्रट काकाचीं हीं करामत —*





# माझ्या काकाच्या पहिल्या लग्नाची गोष्ट

—सदानंद रेगे

माझा एक काका किती वात्रट आहे याची तुम्हांला कल्पना आहेच. त्यानंच मला ही गोष्ट सांगितली. या गोष्टींतलं किती घ्यायचं किती नाहीं हें तुमचं तुम्हींच ठरवा. त्याच्याशीं माझा कांहीं संबंध नाहीं.

काकाच्या अंगावर कसला तरी पुरळ उठला होता. किती औषधं केलीं तरी कांहीं तो बरा होईना. एक दिवस काका मला म्हणाला, " बाळू, उद्यां पहाटे आपण घोपेश्वराच्या उन्हाळ्यावर जाउंया आंघुळ करायला. उन्हाळ्याचं पाणी औषधी असतं असं म्हणतात. आला तर आला गुण. "

एवढ्या पहाटे उठून उन्हाळ्यावर जायचा मला आला होता कंटाळा. मी जरा नाखुषीच दाखवली तसा काका म्हणाला, " वहिनींना संध्या-काळींच मी कोंबडी आणून दिली आहे. बरोबर रगड वडेहि घेऊं, अन् पनामा शिग्रेटची दोन पाकिटं..."

कोंबडी नि वडे मला घरींहि खातां आले असते. पण शिग्रेट ओढा-यला मात्र उन्हाळ्यासारखं ठिकाण नव्हतं. शिग्रेटची दीक्षा मला वात्रट काकाकडूनच मिळाली होती अन् संधि मिळेल तेव्हां आपल्या शिष्याला दिलेल्या या बहुमोल विद्येची उजळणी करूं देण्याचा मोका मुळींच दवडीत नव्हता.

मी झटकन् कबूल झालों.

उन्हाळ्याच्या पाण्यांत हुंदडेहुंदडेपर्यंत सूर्य डोकीवर आला. माझं तर डोकंच गरगरायला लागलं. मी काकाला म्हटलं, " बस झाली बुवा आपल्याला आंघुळ. "

काका म्हणाला, " बाळ्या लेका, तूं अगदींच रे कसा अगदीं हा ! "

काका पाण्याच्या धारेखालीं अजून कां बसून राहिला होता हें माझ्या लक्षांत केव्हांच आलं होतं. कुठल्यातरी शाळेची ट्रीप उन्हाळ्यावर आली होती. त्या मुलांच्या घोळक्यांत कांहीं पोरीहि होत्या. पोरी पाहिल्या कीं काका अगदीं खडीसाखरेच्या खड्यासारखा वितळूं लागतो हें मला माहीत होतं.

" बाळ्या, बावळटा, अरे जरा समोरच्या टांक्याकडे नजर फेंक कीं ! कसं आहे फक्कड पांखरूं ! अरे, शुंभा, जन्मोजन्मीचं पुण्य लागतं असली पोरगी पाण्याच्या धारेखालीं बसलेली दिसायला. "

काका असलं कांहीं बोलायला लागला कीं मी पार लाजून जातों.

तो सबंध दिवस काका त्या पोरीभोंवतींभोंवतीं करीत होता.

आंघुळ आटोपल्यावर आम्हीं दोघांनी कोंबडी-वड्यावर ताव मारला. तरी थोडेसे वडे नि मटन उरलंच.

काका म्हणाला, " थोडा वेळ थांब. तीं पोरे जेवायला बसलीं कीं हें घेऊन जा. "

" पण हें एवढंसं मटन एवढ्या पोरांना पुरणार कसं ? "

" बाळ्या, बाळ्या, बाळ्या...आतां तुला आणखी किती अन् कसं शिकवायचं रे ? "










अन् मग लखकन् माझ्या डोक्यांत प्रकाश पडला. हो, रे हो, म्हणजे हे वडे नि मटन तिला...त्या फक्कड पांखराला नेऊन द्यायचं तर !

अन् मग काकानं सिगारेट काढली. एक आपण घेतली. एक मला दिली.

सिगारेट ओढतां ओढतां काका रंगांत येऊं लागला.

" बाळू, करतोस का त्या पोरीशीं लग्न ? "

मी खालचा ओंठ बाहेर काढला नि डोळ्याचीं बुबळं डोक्याच्या कवटींत खुपसलीं.

" बोल...लेका...हवी असली तर देतों जमवून. "

खरं सांगायचं म्हणजे ती पोरगी माझ्याहि मनांत भरली होती. पण एवढंच. त्याच्यापलीकडे जायची आपली हिंमत नव्हती. तिनं माझ्याकडे नुसतं पाहिलं असतं तरी मी घामानं डबडबलों असतों. मी रोज उन्हाळ्यावर यावं. तिनंहि यावं. मी समोरच्या पायरीवर बसून रहावं. तिनं तासन् तास पाण्याच्या धारेखालीं अंग धूत रहावं नि मी डोळे भरभरून भरभरून तिच्या ओल्या अंगाकडे पहात रहावं. बस्स...एवढीच माझी इच्छा होती.

मी काकाच्या पाकिटांतली आणखी एक सिग्रेट काढली नि ओंठांचा चंबू करून धुराचीं वर्तुळं काढण्याचा प्रयत्न करूं लागलों. कोंबडीचं मटन नि वडे अंगावर येऊं लागले होते. डोळे जडावूं लागले होते. दिसत होता काय तो सिग्रेटचा धूर नि त्या धुराच्या धारेखालीं आंघुळ करणारी ती...ती...

काका सांगत होता नि मी फक्त...फक्त ऐकत होतों...

" बाळू, पोरा, असा ओंठांचा चंबू करून सिग्रेटचा धूर काढला म्हणजे पोरी मिळतात अशी तुझी समजूत असेल तर ती चुकीची आहे. आपल्याला हवी ती पोरगी मिळवायची म्हणजे त्याला हिंमत लागते. डोकं लागतं नि तें डोकं चालवायची अक्कल लागते. काय... हिंमत...डोकं...नि तें चालवायची अक्कल..."

" माझ्या पहिल्या लग्नाची गोष्ट मी तुला कधीं सांगितली आहे का ? नाहीं ना ? मग ऐक तर नीट लक्ष देऊन. अन् तुझ्याजवळच ठेव बरं का. नाहीं तर देशील घरांत भलती सलती आग लावून. तूं आपला माझा आवडता पुतण्या आहेस म्हणून तुला सांगतों आहे. "

" तुझ्या पहिल्या काकीला तूं पाहिली नाहींस. काय सांगूं बाळू, तुला ? अशी नक्षत्रासारखी देखणी होती बघ. एकदां पाहिलं कीं पहातच रहावं असं वाटे. पहिल्यांदा मी तिला पाहिलं अन् अगदीं पागल होऊन गेलों बघ. तिला पाहिल्याबरोबरच मी माझ्याशीं नक्की करून टाकलं कीं, लग्न केलं तर याच पोरीशीं करायचं. नाहीं तर तसंच रहायचं. मी असा विचार केला खरा, पण तें जमायचं कसं ? सोनवणीच्या देसाई वकिलांची ती मुलगी. सोनवणींत देसाई वकील म्हणजे मोठं प्रस्थ होतं. सोनवणीसारख्या गांवांत त्यावेळीं त्याची पांचशें-हजाराच्या घरांत सहज प्रॅक्टीस असेल. म्हणजे काय वैभव असेल त्याचं बघ ! मॅट्रिक झालों नि सोनवणीच्या कोर्टांत, पोस्टांत कुठं नोकरी मिळते कां हें पहाण्यासाठीं म्हणून मी तिथं गेलों होतों. देसाई वकीलांच्याच घरासमोर बनीआत्याची खाणावळ म्हणून एक प्रख्यात खाणावळ होती, तिथं उतरलों, हळुहळू या ना त्या कारणानें देसाई वकीलांच्या घरांत माझा प्रवेश झाला. दिवस रात्र, जेवाखायला, चहा प्यायला मी तेथेंच असायचा. कधीं कधीं देसाई वकील एखाद्या पत्राची कॉपी करायला सांगत तेव्हढी करून दिली कीं बस्स. माझ्या अक्षरावर देसाई वकील खूष होते.

" देसाई वकीलांची बायको, मी सोनवणीला गेलों त्याच्या आदल्याच वर्षी दहाव्या बाळंतपणांत वारली होती. त्यांच्या नऊ मुलांत सहा मुली व तीन मुलगे होते. त्यांची एक लांब लांबची विधवा आत्या सैंपाक-पाणी वगैरे सगळं करीत असे. बायको वारल्यावर, मुलाबाळांवर जितकं लक्ष द्यायला हवं तितकं देसाई वकीलांना देतां येईना. महिन्यांतून दहा बारा दिवस तर ते फिरतीवरच असत. राहिलेल्या दिवसांपैकीं अर्धे-अधिक सोनवणीच्या कोर्टांत कज्जेखटले चालविण्यांत जात. अन् घरीं तर अशिलांची गर्दी असे. तरीसुद्धां, त्यांतल्यांत्यांत ते मुलांवर करडी नजर ठेवून असत.

" हळूं हळूं त्यांच्या पहिल्या मुलीचं नि माझं सूत जमूं लागलं. मी मॅट्रीक झालों तेव्हां ती इंग्रजी चौथींत गेली होती. तिला सकाळ-संध्याकाळ मी आलजिब्रा जॉमेट्री शिकवीत असे. पहिल्यापहिल्यांदां आपलं शिकवणं बरं कीं आपण बरं असा माझा खाक्या होता. नंतर नंतर शिकवणं दूर राहून मी इकडच्या तिकडच्या गप्पा अधिक मारूं लागलों. कौलाराखालीं कबुतरांच्या जोड्या घुमूं लागल्या कीं चोरट्या नजरेनें त्यांची शृंगारसत्रशाली पहात बसूं लागलों. एव्हांना बनीआत्याची खाणावळ सोडून मी देसाई वकीलांच्याच घरीं रहायला आलों होतों. श्यामा वाढायला असली म्हणजे माझ्या पानावर तुपाची धार अधिक पडूं लागली. जेवणानंतर मला पानाचा विडा मिळूं लागला.

" एक दिवस घरांतली सगळीं मुलं शाळेंत गेलीं आहेत असं पाहून नि आत्याबाई देवघरांत वाती वळीत बसल्याची संधी साधून मी श्यामाला खूण करून मागच्या विहिरीवर बोलावून घेतलं नि म्हटलं,








" श्यामा, पुढल्या महिन्यांत बहुधा मला पोस्टांत नोकरी लागेल. "

कपाळावरचा घाम पदराच्या टोंकानं अलगद टिपीत तिनं विचारलं,

' बरं, मग ? '

' मग आपण लग्न कधीं करायचं ? '

" तिचं माझ्यावर प्रेम होतं. माझं तिच्यावर होतं. असं असतांना खरं म्हणजे मी हा प्रश्न अगदीं सरळ सरळ तिला करावा यांत अनुचित असं कांहींच नव्हतं. तरीसुद्धां मी अगदीं तडकाफडकी असं तिला कांहीं विचारीन अशी श्यामाची अपेक्षा नसावी. तसं नसतं तर माझा प्रश्न ऐकून ती दचकली तशी दचकली नसती. "

" तिच्या दचकण्याचं कारण मी ओळखलं होतं. ती भीत होती अण्णांना—आपल्या वडिलांना. त्यांना हें कितपत आवडेल ? "

" माझ्या प्रश्नाला श्यामानं कांहींच उत्तर दिलं नाहीं. आमच्या प्रेमाचं घोंगडं आणखी कांहीं दिवस तसंच भिजत पडलं होतं. एक दिवस मी मनाचा हिय्या केला नि देसाई वकीलांना एकीकडे गांठून विचारलं, ' अण्णा, तुम्हांला एक विचारूं ? "

" विचार. "

" तुम्हीं रागावणार तर नाहीं ? "

" रागावण्यासारखं कांहीं नसलं तर नाहीं. "

" अन् असलं तर ? "

" तर आकाशपाताळ एक करीन. तेवढी तयारी असली तर विचार. "

" मग विचारतोंच तर... "

" विचार कीं, अशी प्रस्तावना किती वेळ करीत रहाणार आहेस ! "

" म...म...ला...मला... "

" काय ?...मला मला काय ! "

" मला... "

" तुझ्या नोकरीचं ना ? "

" नाहीं. नोकरीचं नाहीं. मला...मला ..तुमच्या...श्यामाशी लग्न करायचं आहे ! "

त्या बरोबर अण्णा देसाई रागाने नुसते लालेलाल झाले. त्यांनीं धारण केलेला रुद्रावतार मला पाहवेना.

" श्यामा...... "

अण्णांच्या आवाजानं घर नुसतं दणाणून गेलं. थरथर कांपत श्यामा त्यांच्या समोर येऊन उभी राहिली.

" काय म्हणतो आहे हा ? "

श्यामा खालीं मान घालून नुसती उभी होती.

" बोलायला वाचा नाहीं का दिली देवानं ? "

तिनं मान वर करून एकदां अण्णांच्या नजरेला नजर भिडविली.

" तुला लग्न करायचं आहे का ? "

तरीहि ती कांहीं बोलली नाहीं.

" मग मला का सांगितलं नाहींस येऊन ? या गाढवाशीं लग्न करून खाणार आहेस काय फत्रे ? "

आतां मात्र मला रहावेना. मी पुढें झालों नि माझ्या परीनं आवाज चढवीत म्हणालों, " अण्णा, असलं कांहीं बोलायचं काम नाहीं. आज ना उद्यां मला कुठं नोकरी मिळाल्याशिवाय का रहाणार आहे ? "

" नाहीं...माझ्या श्यामाचं लग्न मी वालिस्टराखेरीज दुसऱ्या कुणाशीं होऊं देणार नाहीं...नाहीं...नाहीं... "

त्या दिवशीं मी सोनवणी गांव सोडलं. अण्णांच्या घरांतून निघतांना अण्णा घरीं नव्हते. त्यांना एक चिठ्ठी ठेवली. अण्णा, मी जातों. या जन्मीं लग्न केलं तर तुमच्याच मुलीशीं करीन नाहीं तर तसाच राहीन.

सोनवणी गांव मी शरीरानं सोडलं खरं, पण माझं मन तिथेंच गुंतलं होतं. कांहीं केल्या तें आतां तिथून सुटणार नव्हतं. मी वेडा झालों होतों. श्यामाच्या बातम्या मी वरचेवर काढीतच होतों.

एक दिवस माझ्या कानीं बातमी आली कीं, श्यामाचं लग्न मुंबईच्या कुठल्या तरी ॲडव्होकेटबरोबर व्हायचं घाटत आहे. आतां मला हातपाय हलवायला पाहिजेच होते. एक दिवस उठलों नि तसाच सोनवणीला गेलों. श्यामाला शाळेच्या दारापाशीं गांठून विचारलं, " तुझं लग्न ठरलं आहे ? "

ती म्हणाली, " हो. "

" तुला हें पसंत आहे ? "

ती म्हणाली, " नाहीं. "

" माझ्याशीं लग्न करायला तूं तयार आहेस ? "

ती हातांतल्या कंपासपेटीशीं चाळा करूं लागली.

मला मिळायचं तें उत्तर मिळालं.

" आज तूं घरीं गेल्यावर मी सांगतों तसं करशील ? "

तिनं भुंवया किंचित् वर झुकावून विचारलं, " काय ? "

मी तिला द्यायचा तो कानमंत्र दिला अन् बनीआल्याच्या खानावळींत मुक्कामाला आलों.

त्या दिवशीं रात्रीं अण्णा कोर्टांतून घरीं आले नि मुंबईच्या ॲडव्होकेटकडून आलेलं पत्र दाखविण्यासाठीं म्हणून त्यांनीं ओटीवरूनच श्यामाला हांक मारली.

---

## गाथा सप्तशती

एक काळवीट उजवीकडून वळून
आडवा गेला
तर प्रवास थांबवावा लागतो;
मग प्रियेचे व्याकुळ व ओले दोन डोळे
तिरपे आडवे आल्यावर
प्रवास रहित झाला तर काय नवल ?



गाथा सप्तशती १९५९

तेवढ्यांत आत्याबाईंनीं त्यांना येऊन अगदीं हळू आवाजांत सांगितलं, " श्यामा रडते आहे. "

" रडते आहे ? कशासाठीं ? "

" विचारलं तर कांहीं बोलत नाहीं. "

" तिला म्हणावं, लग्न जुळत आलं आहे. "

" आपण नाहीं तिला कांहीं सांगणार. तूंच सांग काय सांगायचं तें. "

अण्णा माजघरांत आले. तिथंच दाराजवळच बांकड्यावर गुडघ्यांत मान घालून श्यामा रडत होती.

" श्यामा, श्यामा, असं रडायला काय झालं ? " अण्णांनीं तिच्या पाठीवरून हात फिरवीत विचारलं.

पण ती कांहीं केल्या बोलेना. तसे अण्णा पुन्हां चिडले.

" अग बोल ना...बोलल्याशिवाय तुला काय म्हणायचं आहे तें कसं समजणार ? तुझं कांहीं दुखतं का आहे ? तुला हें लग्न पसंत का नाहीं ? काय, काय, झालंय तरी काय तुला ? "

एक नाहीं नि दोन नाहीं. ती आपली रडतच होती. मग अण्णांनीं दांत ओंठ खात तिचे दोन्ही खांदे धरले नि तिला गदगदां हलवून म्हटलं, " बोल...बोल...पोरी...बोल...नकोस विनाकारण असा जीव खावूं ! "

अण्णांचा तो अवतार पाहून घरांतलीं सगळीं मुलं अगदीं भेदरून गेलीं होतीं. काय होतंय् नि काय नाहीं —कुणालाच कांहीं कळत नव्हतं.

" अग बोल ना...बोल ! "

पण अंहं...श्यामा कांहींच बोलेना नि तिचं रडणंहि थांबेना.

" आत्याबाई, तुम्हीं तरी सांगा तिला कांहीं. "

" आत्याबाई काय सांगणार ? त्या नुसत्या श्यामाजवळ गेल्या नि तिच्या पाठीवरून हात फिरवूं लागल्या.

" नाहीं बोलायचं तर बस अशीच रात्रभर रडत. मी हा चाललो. "

अण्णा जायला निघाले तशी श्यामा, गुडघ्यांतली मान वर न करतांच म्हणाली, " तुम्हीं रागावणार नसाल तर सांगतें. "

" सांग...सांग... "

" रागावणार नाहीं ? "

" नाहीं...नाहीं... "

" अंगावर हात टाकणार नाहीं ? "

" अग नाहीं...नाहीं...पण असं झालंय् तरी काय ? "

" पहा रागावलांत... "



" बरं नाहीं...सांग. "

" काल मी शाळेंत जात होतें तेव्हां ठेंच लागून माझी नवी चप्पल तुटली. "

अन् पुन्हां ती मुसमुसून रडूं लागली.

" हात्तीच्या...एवढंच ना. चप्पल तुटली तर लावून घे. नाहींतर दुसरी घेऊन ये. चप्पल तुटली म्हणून का कुणी असं रडतं ? वेडी कुठली ! "

पण अजूनहि श्यामाचं रडूं आवरेना.

" अरेच्या...सांगितलं ना नवी चप्पल घेऊन ये म्हणून ! मग आतां कशाला रडतेस ? "

श्यामा कांहीं बोलेना. तिचं रडंहि थांबेना.

" आज काय हिचं डोकं बिचकं फिरलंय् कीं काय ! अहो आत्याबाई, मीठमोहऱ्या तरी थोड्या उतरून टाका हिच्यावरनं ! " अण्णा गरजले.

त्यांचं गरजणं टिपेला भिडत होतं तसं श्यामाचं रडणंहि वाढत होतं.

" अग झालंय् काय तुला असं ओक्साबोक्शी रडायला ? आईची आठवण आली ? "

अंहं...एक नाहीं नि दोन नाहीं.

" माझं बुवा डोकं फिरायची पाळी आली आहे... "

अन् गुडघ्यांत घातलेली मान वर न करतांच श्यामा म्हणाली, " रागावणार नसलात तर सांगते. "

" सांग...लौकर सांग. मला उद्यांच्या केसीस वाचायच्या आहेत जेवणखाण करून. "

" नको...मला तुम्हीं माराल. "

" नाहीं मारणार. "

" सांगूं ? "

" हं. "

" मी ठेंच लागून पडलें नि त्या गोंधळांत माझ्या हातांतली कंपासपेटी कुठं पडली कुणास ठाऊक ! "

" हं...एवढंच ना ? कंपासपेटी गेली म्हणून असं रडतात वाटतं ? श्यामा, आज तुला झालंय् तरी काय ? "

अन् श्यामा पुन्हां मुसमुसून रडूं लागली.

" श्यामा...श्यामा... "

अंहं...अजून तिचं रडणं संपलं नव्हतं.

" अग...कंपासपेटी गेली तर गेली. किती पडतात नव्या कंपासपेटीला ? कमळे, उद्यां हिला चार नव्या पेट्या घेऊन ये पाहूं. झालं ! आतां तरी थांबशील कीं नाहीं रडायचं ? "

तरीहि श्यामा रडतच होती.

" श्यामा अग आतां तरी...छे...छे...छे...आत्याबाई, आत्याबाई...हें काय चाललंय् हो !... "

श्यामा गुडघ्यांतली मान न काढतांच म्हणाली, " सांगतें...पण तुम्हीं रागावणार नसाल तर. "

" तुला लिहून देऊं का प्रॉमिसरी नोटवर रागावणार नाहीं म्हणून ? "

अनुक्रमणिका







"रागावलां नाहींत तरी माराल."

"नाहीं...नाहीं...नाहीं..."

"काल शाळेंत जातांना नदीच्या पात्रांत मी घसरून पडलें..."

"लागलंय का कुठं ?"

"अन् पायांत अडकून माझी नवी साडी फाटली. तुम्हीं आईसाठीं मुद्दाम इंदूरहून घेऊन आलां होतात ती."

"जाऊं दे. फाटली तर फाटली. आतां ती तूं अशी रडल्यानं का पुन्हां होती तशी होणार आहे ? चालायचंच. अशा नव्या वस्तु जुन्या व्हायच्या, जुन्या वस्तु नाश पावायच्या. एवढंच ना ? मग आतां रडूं आवर पाहूं. कमळे, अग कमळे, पाटपाणी घ्या पाहूं...जेऊन मला कामाला लागूं द्या."

पण अण्णा जेवतात कसले नि कामाला लागतात कसले !

अजून श्यामाचं रडगाणं संपलं होतं कुठं ?

"आतां काय राहिलं आहे आणखी ? माझे आई, आतां हें रडणं आवर एकदां. मी हरलों."

गुडघ्यांत घातलेली मान वर न काढतांच श्यामा म्हणाली, "सांगते. पण तुम्हीं..."

"नाहीं.. नाहीं...रागावणार नाहीं...नि तुझ्या अंगावर हातहि उगारणार नाहीं. पण बाई ग, काय सांगायचं तें एकदां सांगून टाक. असा जीव खाऊं नको माझा."

"नदीच्या पात्रांत पाय घसरून मी पडलें नि माझ्या गुडघ्याला पुष्कळ खरचटलं."

"आत्याबाई, घरांत आयडीनची बाटली आहे ना ?"

"मी पाण्यांत पडून वहातच जायची, पण तेवढ्यांत एका मुलानं मला धरलं नि किनाऱ्याला आणलं"

"पोरी, तुझं नशीब थोर म्हणून वाचलीस."

"माझं सगळं अंग ओलेंचिंब झालं होतं. त्या मुलानं मला अलगद उचलली अन् किनाऱ्याजवळच्या हिरवळीवर आणून ठेवली. थोड्या वेळानं मी शुद्धीवर आलें नि डोळे उघडून पाहिलं तों तो तरुण माझं अंग आपल्या अंगांतील सुक्या सदऱ्यानं पुशीत होता होता. त्यानं मला विचारलं, 'लागलंय का कुठं ?' मी खरचटलेल्या गुडघ्याकडे हात केला. त्यांनीं माझी साडी गुडघ्यापर्यंत वर केली..."

"श्यामा..." अण्णांच्या गर्जनेनं सारी आळी हादरली.

"पहा, रागवलांत !"

"बरं, आतां नाहीं रागवणार."

"त्या तरुणानं माझी साडी गुडघ्यापर्यंत वर केली नि गुडघ्याला जिथं खरचटलं होतं तिथं आपलं तोंड लावलं. मी म्हटलं, 'काय करतां आहांत ?' तो म्हणाला, 'रक्त वहातं तें थांबवतों आहे...'"

"बरं मग ? पुढं काय झालं ?"

"पुढं कांहीं नाहीं...कांहीं झालं नाहीं..."

"अगदीं कांहीं नाहीं ?"

"कांहीं नाहीं...अगदीं कांहीं नाहीं. मी मग घरीं आलें. तो मला घरापर्यंत पोंचवायला आला होता."

यावर अण्णा खूप मोठमोठ्यानं हंसले.

(पान ३१ वर चालू)

१५० वर्षांपूर्वींचा महाराष्ट्र



## सवाई माधवराव लग्न करतात

सवाई माधवराव यांच्या लग्नाचा बेत शके १७०४ मध्यें ठरला. बाळाजी बहिरव थत्ते यांची कन्या वधू नेमस्त केली. लग्न माघ मासी व्हावयाचे होते. लग्नाकरितां सरकारी मंडळी, मामलेदार मंडळी, पुण्यांतील नागरिक अशी ब्राह्मण मंडळी, गृहस्थ, भिक्षुक, अग्निहोत्री, दीक्षित, शास्त्री, वैदिक, ज्योतिषी, उदीम व्यापारी, सावकार सराफ या सर्वांस निमंत्रणें गेली. त्या खेरीज अष्ट प्रधान, लहानथोर सरदार व हिंदुस्थानांतील सर्व राजेरजवाडे यांनाहि बोलवण्यांत आले होते. निजामअलीकडे पुण्याहून कारकून सरंजाम देऊन पाठविलं, तेव्हां नबाब बोलले 'बहुत अच्छा है. रावपंडित प्रधान इन्की शादी होती है. तुमने साथफौज लेके सरंजाम समेत पुणे सादीकू जाना.' नबाबाचा हा हुकूम पोलाजंग यास झाल्यावरून पोलाजंग पुण्यास आला.

कृष्णाजी नाईक थत्ते यांच्या वाड्यांत लग्नसमारंभ झाला. लग्नाकरितां सवाई माधवराव निघाले, त्या मिरवणुकीचे वर्णन पुढीलप्रमाणें 'श्रीमंत देवास नमस्कार करून स्वारी बाहेर निघाली. थोरला हत्ती विनायक गज आणवून त्याजवर रुप्याची अंबारी ठेवली. त्यांत श्रीमंत बसले. पाठीमागे खवासखान्यांत आप्पा बळवंत व अमृतराव पेठे हाती चवऱ्या घेऊन बसले. पुढें खास जिलबीस बोथाटी-बारदार, विटेदार व बाणदार व लगी, त्यांच्यापुढें खास बारदार अशा जिलीब पुढें चालली. पुढें वाजंत्र्याचे ताफे ताशे मरफे दोनशे वाजूं लागले. त्यापुढें चौघडे वाजतात. त्याचे पुढें जिलबीचे हत्ती शेपन्नास चालिले आहेत. त्यामागे जरीपटक्याचा हत्ती, मागे कोतवाल घोडे, पांचसातशे सोन्याचे गंडे पट्टे व पाठीवर भरगची झुली, गळ्यांत मोहोरा–पुतळ्यांच्या माळा (असे चालले). जिलबीच्या हत्तीपुढें पांच हजार खासे घोड्यावर स्वार होऊन बंदुकांचे आवाज करीत चालले. त्यांच्यापुढें दहा हजार स्वार चालला. अशी स्वारी लग्नास वाडा डावा घालून निघाली, तेव्हां आघाडी पानशे यांचे वाड्यापाशीं होती. श्रीमंतांच्या अंबारीमागें साहेब नौबती वाजत चालल्या. वाड्यापासून तोफखान्यापावेतो एकसारखा फौजेचा थाट उभा राहिला आहे. सरकारचे अंबारीमागे वऱ्हाडिणी बायका याणी चालावे. बायकांमध्यें पुरुषांची दाटी न होई अशा बेताने सभोवती शिपाई चालिले त्यांच्यामागे भिक्षुक मंडळी, शास्त्री, पुराणिक, अग्निहोत्री, ज्योतिषी व वैदिक असा समुदाय चालला.

त्यांच्यामागे मोठाले सरदार, मानकरी, होळकर, गायकवाड, भोसले, विंचूरकर, पटवर्धन, राजेबहादूर, गणेशपंत बेहरे, बहिरो

अनुक्रमणिका






अनंत, घोरपडे, निंबाळकर, जाधव, दरेकर, पाटणकर, थोरात, मोहिते, भोइटे, अक्कलकोटवाले, असे मानकरी चालले. त्यांच्यामागे सातारकर महाराज, अष्टप्रधान समवेत व त्यांच्यामागे नबाब पोलाजंग आणि राजेरजवाडे, संस्थानिक, परराज्यांतील वकील असा समुदाय मिरवत चालला असतां त्यांच्यामागें सरकारची मुत्सद्दी मंडळी नाना फडणिससुद्धां समागमे कारकून मंडळी, शेटसावकार, उदीम असा पुण्यांतील समुदाय चालला. त्यांच्यामागे पागे सकल व कारखानदार सरकारचे व दरकदार पोतनीस, चिटणीस, मुजुमदार असे मिरवीत असतां त्यांच्या पाठीमागे पागा घोड्यावर स्वार होऊन चालले. उंटावरील नौबती शतावधि वाजतात. अशा थाटानें व अशा समुदायाने मोठ्या सरंजामाने चालत असतां शहरचे लोक दुरस्ता माडीवर व गच्च्यावर उभे राहून तमाशा पहातात. त्यासमयीं शहरचे लोकांनी सोन्यारुप्याची फुलें श्रीमंतांवर उडविली. अशी स्वारी समारंभाने नवरीचे मंडपांत पोहोंचली.

" त्या समयीं जलकुंभ मस्तकीं घेऊन दासी उभ्या. दहीभात वरून ओवाळून टाकिले. कुळंविणी घागरी घेऊन उभ्या होत्या त्यांस देणगी देऊन स्वारी मंडपांत दाखल होऊन राजेरजवाडे, सातारकर महाराज, अष्टप्रधान, व पोलाजंग आपले सरदार लोकसुद्धां जसे जातेवेळेस लग्नास गेली. तसेच येते वेळेस त्याच थाटानें मिरवत हवया, नळे, चंद्रज्योति, झाडे नानातऱ्हेची सोडीत सोडीत सुमुहूर्तानें वाड्यांत दाखल झाले. नाचरंग सर्व होऊन लक्ष्मीपूजन होऊन सर्वांस पानसुपारी वगैरे अत्तरगुलाब हारतुरे वाटले. मग सर्वांस घरीं जाण्यास हुकूम झाला.

" दुसरे दिवसापासून सर्वत्र लोकांस मेजवानींची आमंत्रणें करून भोजनास बोलाविलें. मंडळी तितकीच आलीं. वाढावयास सर्व कारकून मंडळी नेमिली. तूप वाढावयास शहरचे सराफ नेमले. एकएका पदार्थास एक एक कारकून नेमला. सारे कारकून पीतांबर नेसून शालजोड्या कंबरेस बांधून वाढावयास लागले. चार चार कारकुनांमागें एकेक शिष्या हातीं ओलीं धोत्रें घेऊन वाढणारांचे घाम पुशीत असे. असा रोज समारंभ होत राहिला. होळकर, गायकवाड, भोसले, व सरकारचे मानकरी घोरपडे, जाधव, निंबाळकर, पाटणकर दरेकर, मोहिते, शिरके, थोरात, धुळप, खानविलकर, अशी मंडळी व पागे पथकेसुद्धां एकांडे अशा अवघ्यास भोजनास घालून वरासजी बसले. वरकड मंडळी मंडपांत दाखल झाली. श्रीमंत बसले त्या ठिकाणीं आप्पा बळवंत व अमृतराव पेठे व दाजीबा आपटे वगैरे झाडून मंडळी बसली. नंतर मधुपर्क विधि होऊन पाणिग्रहण विधि झाला. त्या समयीं वाजंत्र्यांचे बाजे, चौघडे व नौबती अशी एकदांच सारीं वाजूं लागलीं व तोफांची सरबत्ती झडली. मग विवाह होम होऊन ब्राह्मणांस दक्षिणा मंडपांत वाटली. मंडपांत वऱ्हाडी होते त्यास पानसुपारी, हार, गजरे, तुरे वाटले. मग सर्वत्र मंडळी सरकारचा निरोप घेऊन निघाली ती आपआपले ठिकाणीं गेली. श्रीमंत मात्र राहिले.

" तेथें चार दिवस समारंभ भोजनाचा झाला. मुत्सद्दी मंडळी व बाहेरचे वऱ्हाडी सरदार वगैरे या अवघ्यांस चार दिवस यथासांग सोहाळा झाला. बाहेरची सरदार मंडळी व मराठे मानकरी यांस भोजने सरकारवाड्यांत झाली. मोठी दक्षणा देऊन देकार रमण्यांत झाला. चार दिवस झाल्यावर साडे होऊन वरातेची मिरवणूक निघाली. त्या दिवशीं शहरांत सारे रस्ते झाडून सडे टाकून चिराकयानें लावली. सरकारची स्वारी अंबारींत बसून वाड्यांत यावयास निघाली. सारे सरदार, मानकरी, सर्वांस पोशाख योग्यतेनुरूप दिले. तसेच ब्राह्मण सरदार विंचूरकर, पटवर्धन, रास्ते, बहेरे, बहिरो अनंत, राजेबहादूर, बारामतीकर, आप्पा बळवंत, बन्याबापू मेहेंदळे, पुरंधरे, पानशे या सर्वांस अलंकार, वस्त्रें योग्यतेनुरूप दिली.

" शेवटीं नबाब पोलाजंग यास जाफत करण्याचे बलावणे केले. त्या दिवशीं पंधराशे खासा नबाबासमागमे आला. त्यास भोजनास पंधराशे रिकाबा ( ताटें ) रुप्याच्या नव्या करविल्या. त्या सर्वत्रास मांडिल्या. कारकून मंडळी अंगांत जामेनिमे घालून पायात विजारी घालून कंबरेस पटके बांधून वाढावयास लागली. सर्वत्रांची भोजने झाली. अवघ्यानी वहावा केली. मग विडे, पानसुपारी, अत्तर गुलाब, हार तुरे, गजरे देऊन सर्वत्रास पोशाख दिले. नबाबास जवाहिर दिले. असे होऊन सर्व आपूले गोटांत गेले. सरदार मानकरी व शिलेदार कोणी राहिला नाहीं. असे सर्वत्रांचे सत्कार झाले. "

—पेशव्यांची बखर

(पान २९ वरून चालू)

'अग, यांत एवढं रडायला काय झालं? खूप खरचटलं आहे का तुझ्या गुडघ्याला. पाहूं या!"

अण्णा श्यामाचा गुडघा पाहायला म्हणून खालीं वांकले, तशी श्यामा अधिकच स्फुंदून स्फुंदून रडूं लागली.

"आतां आणखी काय सांगायचं राहिलं आहे?"

"तुम्हीं रागवणार नसलांत तर..."

"श्यामा, पोरी, आतां मात्र मी रागावेन हं."

"मग नाहीं मी सांगणार कांहीं."

"बरं, आमचं राहिलं. नाहीं रागवणार."

"मला माराल?"

"नाहीं... नाहीं... नाहीं."

"मग कान करा इकडे."

अण्णांनीं बसल्याबसल्याच आपला उजवा कान तिच्या ओंठापाशीं नेला.

"त्या... त्या तरुणानं काल माझ्या गुडघ्याच्या जखमेला तोंड लावलं नि अण्णा, आज... आज... आज..."

"बोल... बोल... मी ऐकतों आहे."

"आज माझ्या पोटांत गर्भ राहिल्यासारखा वाटतो आहे हो!"

"श्यामा..."

अण्णांचे डोळे खदिरांगासारखे लाल झाले. त्यांचं अंग थरथरा कांपूं लागलं.

"कोण कोण होता तो भामटा? बोल, श्यामा, लवकर मला त्याचं नांव सांग. त्याच्यावर फिर्याद ठोकतो उद्यांच्या उद्या."

श्यामानं माझं नांव अण्णांच्या कानांत सांगितलं तशी त्यांच्या अंगाचा अधिकच भडका उडाला.

"असा. असा दावा साधला काय त्यानं?"

अण्णा खूप तडफडले. रात्रभर ते माडीवर दाणदाण करीत होते. पण आतां त्यांच्या हातांत कांहीं राहिलं नव्हतं. श्यामाचं लग्न त्यांना माझ्याशींच करून देणं क्रमप्राप्त होतं.

"दुसऱ्या दिवशीं त्यांनीं मला बोलावणं पाठविलं नि आमच्या लग्नाचा दिवस मुक्रर झाला."

"मूर्खा, लेका असं डोकं चालवायला लागतं आपल्याला हवी ती पोरगी मिळवायची असली तर!"

मला कांहीं काकाची ही करणी आवडली नाहीं. मी मनांतल्या मनांत त्याच्यावर चिडलों होतों. हातांतलं सिगारेटचं थोटुक फेंकून देत मी त्याच्या अंगावर ओरडलों, "काका, असले धंदे करायला तुला शरम वाटायला हवी होती."

"कसले धंदे?"

"लग्नापूर्वी एका मुलीला तूं गर्भवती केलीस..."

"बाळ्या, शुंभा, तूं अगदींच कसा रे हा! माझी श्यामा एवढी का मूर्ख होती!"

"मग...?"

"अरे बावळटा, ती माझ्यापासून गर्भाशी आहे असं खोटंखोटंच अण्णांना तिनं त्या दिवशीं सांगितलं नसतं तर तिचं लग्न त्या मुंबईच्याच ॲडव्होकेटाशीं झाल्याशिवाय राहिलं नसतं. माझंच डोकं होतं हें सगळं. म्हणून म्हणतों, भोटमामा, आपल्याला हवी ती पोरगी मिळवायची म्हणजे माणसाला हिंमत लागते, डोकं लागतें नि तें चालविण्याचीहि अक्कल लागते. या काकापासून शीक कांहीं धडे. चल ऊठ, घे हे बडे नि मटन नि पळ पाहूं. बघूं या तुझी हिंमत..."

एव्हांना काकाविषयीं माझ्या मनांतून गेलेला आदर परत आला होता. मला त्याच्या अकलेचं नेहमींच कौतुक वाटत आलं आहे. अन् त्याचा वात्रटपणाहि हवाहवासा वाटला आहे.

मी त्याच्या खिशांतलं सिगरेटचं पाकीट काढलं नि एक सिगारेट तोंडांत धरतां धरतां हुकूम केला, "काड्याची पेटी"

पण माझ्याकडे त्याचं लक्षच कुठं होतं मुळीं! तो त्या मुलीकडे टक लावून पहात होता. काय त्याच्या डोक्यांत चाललं होतं हें त्याचं त्यालाच ठाऊक!

असा हा आमचा काका नि अशी त्याची पहिल्या लग्नाची गोष्ट!

• • •

महाराष्ट्र शाहीर कै. गोविंदाग्रजांनीं महाराष्ट्राला दगडांचा देश असें प्रेमानें म्हटलें. परंतु या दगडांच्या देशाच्या आर्थिक प्रगतीबाबत मनीं साशंकता निर्माण होण्याचें कांहींच कारण नाहीं. प्रत्येक महाराष्ट्रीयाच्या मनांत आशा आणि उत्साह निर्माण करणारें हें साधार विवेचन—




गोविंदाग्रजांनीं ज्याला 'दगडांचा देश' म्हटलें आहे त्या महाराष्ट्राची आर्थिकदृष्ट्या स्थिति काय आहे, त्याचे महत्त्वाचें आर्थिक प्रश्न कोणते आणि त्याच्या आर्थिक प्रगतीची दिशा कोणती याचा विचार येथें करावयाचा आहे. महाराष्ट्राच्या सद्यःस्थितीचें अवलोकन करणें हें सोपें असलें तरी खरें म्हणजे महाराष्ट्राचें भावी अर्थकारण राजकारणावर अवलंबून आहे. जोपर्यंत स्वतंत्र मराठी राज्य हें स्वप्नच आहे आणि जोपर्यंत महाराष्ट्र हा द्विभाषिक राज्याचा एक भाग आहे तोपर्यंतचें महाराष्ट्राचें अर्थकारण आणि स्वतंत्र मराठी मुलुखाचें अर्थकारण यांत निश्चित महत्त्वाचा फरक असेल. आपल्या भविष्याचें शिल्प स्वतंत्रपणें घडविण्याची संधी महाराष्ट्राला मिळाली नसल्यामुळें त्याच्या भावी कालाविषयीं केवळ कांहीं अंदाज बांधणें व कांहीं अपेक्षा करणेंच शक्य आहे.

भाषावर प्रांतरचनेचें सूत्र कॉंग्रेसनें केव्हांच ग्राह्य मानलें होतें. त्याप्रमाणें स्वातंत्र्यप्राप्तीनंतर ब्रिटिशकालीन प्रांतरचना बदलून भाषावर प्रांतरचना निर्माण करण्यांत आली. महाराष्ट्र आणि गुजरात हेच काय ते याला अपवाद राहिले. असे ठळक अपवाद करून महाराष्ट्र गुजरातचें द्विभाषिक राज्य करण्यामागें काय राजकारण असेल तें असो परंतु यामुळें या दोन्हीं राज्यांच्या स्वतंत्र अर्थकारणावर महत्वाचा परिणाम झाला आहे. आणि जोपर्यंत द्विभाषिक मोडून एकभाषिक तत्त्वावर रचना होत नाहीं तोपर्यंत तो होत राहील यांत कांहींच संशय नाहीं. तसेंच आपलें स्वतंत्र अर्थकारण यशस्वी करण्यासाठीं दोन्ही लोकांना यशस्वी राजकारण करतां आलें पाहिजे हें उघड आहे. तसें होईपर्यंत स्वतंत्र राज्याच्या स्वप्नाबद्दल स्वप्नरंजन करण्यापलीकडे आणि तें सर्व कधींतरी साकार होईल अशी अपेक्षा करण्यापलीकडे दुसरें गत्यंतर नाहीं.

## स्वयंपूर्ण महाराष्ट्र

जुन्या मुंबई राज्यांतले १३ जिल्हे व मुंबई असलेला पश्चिम महाराष्ट्र, जुन्या मध्यप्रांतांतील मराठी भाषिकांचे ८ जिल्हे असलेला विदर्भ आणि जुन्या निजामशाहींतील ५ जिल्हे असलेला मराठवाडा या प्रदेशांचा संयुक्त महाराष्ट्र बनतो. १ लक्ष १९ हजार चौरस मैल पसरलेला हा देश आर्थिकदृष्ट्या स्वयंपूर्ण होईल एवढेंच नव्हे तर भाषिक तत्त्वानुसार निर्माण झालेल्या इतर राज्यांच्या तुलनेनें पहातां आर्थिकदृष्ट्या सरासरीनें जास्त समर्थ आहे असें संयुक्त महाराष्ट्र समितीनें राज्यपुनर्रचना समितीला सादर केलेल्या मसुद्यांत साधार आणि सविस्तर दाखवून दिलें आहे.

समितीनें म्हटल्याप्रमाणें स्वयंपूर्णता या संज्ञेचे दोन अर्थ असू शकतील. किमान पातळीवर अस्तित्व टिकवून धरून कारभार चालविण्याची क्षमता हा एक अर्थ. हा बराच संकुचित अर्थ झाला. या उलट विकास, लोककल्याण इत्यादि आजच्या राज्यांचीं जीं उद्दिष्टें आहेत तीं चांगल्यारीतीनें साधतां येण्याइतकी क्षमताही वरील क्षमतेशिवाय अधिक असणें असा व्यापक अर्थहीं घेतां येईल. निसर्गतः मिळालेला योग्य आकार, आवश्यक तेवढी आणि एकवटलेली साधनसंपत्ति यांच्या साहाय्यानें महाराष्ट्राला आपला विकास साधतां येईल. विकास योजना पुऱ्या करण्याइतकी संपत्ति महाराष्ट्राजवळ आहे आणि केलेल्या गुंतवणीवर पुरेपूर फायदा मिळेल अशी परिस्थिति आहे. नुसत्या उत्पन्नाच्या आंकड्यांवरूनच पाहिलें तर असें दिसतें कीं १९५१–५२ या वर्षांत महाराष्ट्रांतील प्रमुख विभागाचें महसूल उत्पन्न रु. १७·३ इतकें होतें. रु. ११·७ ही सबंध भारताची त्या वर्षाची सरासरी आहे हें फिनान्स कमिशनच्या अहवालावरून दिसतें. असें असल्यामुळें उत्पन्नाच्या महत्त्वाच्या निकषानें पहातांही महाराष्ट्र हा आर्थिकदृष्ट्या स्वयंपूर्ण आहे असें निश्चित म्हणतां येतें.

खरें म्हणजे भाषावार रचना करतांना निदान कांहीं राज्यांच्या बाबतींत तरी आर्थिक स्वयंपूर्णतेला महत्त्व दिलेलें दिसत नाहीं. उदाहरणार्थ ओरिसा आणि राजस्थान यांचीं उत्पन्नें तुलनेनें खूपच कमी आहेत आणि विकासाकरितां त्यांच्या अडचणी आणि गरजाही मोठ्या आहेत. असें असूनही हीं स्वतंत्र राज्यें होऊं शकलीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे. स्वतंत्र महाराष्ट्र आर्थिकदृष्ट्या स्वयंपूर्ण होणार नाहीं असें कोणी गंभीरपणें म्हणेल असें वाटत नाहीं, पण तसें कोणी म्हटलेंच तर आंकडे त्याच्यापेक्षां मोठ्यानें बोलूं लागतील.

## सस्यश्यामल

१९५१ च्या आंकड्यांकडे लक्ष टाकलें

असतां असें दिसतें कीं एकंदर लागवडीस आणलेल्या जमिनीपैकीं ५८% जमिनींत अन्नधान्यें, १४% जमिनींत कडधान्यें, ११% जमिनींत गळिताचीं धान्यें आणि १३% जमिनींत कापूस पिकविला जात असे. उरलेल्या ४% जमिनींत ऊंस, तंबाखू हीं आणि इतर पिकें काढलीं जात. भारतांत कापूस पिकविणाऱ्या जमिनीपैकीं २५% जमीन एकट्या महाराष्ट्रांत आहे. हें प्रमाण इतर कुठल्याही राज्यापेक्षां जास्त आहे. त्याचप्रमाणें बाजरी (१६%) आणि ज्वारी (३२%) हीं दोन्ही क्षेत्रफळें इतर कुठल्याही राज्यापेक्षां जास्त आहेत. बाजरी पिकविणारी जमीन पश्चिम महाराष्ट्रांत जास्त, मराठवाड्यांत द्विदल डाळींचें आणि गळितांचें उत्पन्न जास्त. कापसाची जमीन विदर्भांत जास्तींत जास्त, त्या खालोखाल मराठवाड्यांत व सर्वांत कमी पश्चिम महाराष्ट्रांत. ही उणीव पश्चिम महाराष्ट्रानें ऊंसाचें उत्पादनांत पहिला क्रमांक मिळवून भरून काढली आहे. एकंदर भारताच्या दृष्टीनें आणि निसर्गाची इतराजी झालेल्या कांहीं राज्यांच्या तुलनेनें पाहतां महाराष्ट्र वाटतो तितका दगडांचा देश नाहीं. इतर दगडांपेक्षां ही वीट खूपच मऊ आहे. भारताच्या एकंदर ज्वारीच्या उत्पन्नापैकीं २९%, एकंदर कापसाच्या उत्पन्नापैकीं २५%, भुईमुगाच्या उत्पन्नापैकीं १६%, एरंडीच्या उत्पन्नापैकीं १२%, अळशीच्या उत्पन्नापैकीं ११%, ऊंसाच्या उत्पन्नापैकीं १०%—अशीं उत्पन्नें महाराष्ट्रांत निर्माण होतात.

## उद्योगधंदे

महाराष्ट्रांतील औद्योगिक उत्पादन केन्द्रांचीं संख्या पाहतां कापड धंदा हा महाराष्ट्रांतील प्रमुख धंदा होय. भारताच्या एकंदर कापड आणि धाग्याच्या उत्पादनाचा अनुक्रमे ४६% आणि ४४% भाग महाराष्ट्रांत निर्माण होतो. बहुतेक कापडधंद्याचें केंद्रीकरण मुंबईशहरांतच झालेलें आहे. महाराष्ट्रांतला दुसऱ्या क्रमांकाचा धंदा साखर उत्पादनाचा आहे. येथें २५ पेक्षां जास्त साखर कारखाने असून तीन वर्षांपूर्वी आपलें साखर उत्पादन भारतांत तिसऱ्या क्रमांकाचें होतें. या दोन मुख्य धंद्यांशिवाय महाराष्ट्रांत अनेक छोटे उद्योगधंदे आहेत. त्यांत हातमाग आणि पॉवरमाग यांची प्रामुख्यानें गणना होते.

## महाराष्ट्र आणि त्याचे विभाग

आतां महाराष्ट्र आणि त्याचे तीन विभाग यांचा थोडा तौलनिक अभ्यास. हा अभ्यास केला असतां असें दिसतें कीं मराठवाडा हा भाग सर्वांत अप्रगत आहे. त्यापेक्षां विदर्भाची परिस्थिति जास्त चांगली आणि सर्वांत पश्चिम महाराष्ट्राची.

५१ सालच्या शिरगणतीच्या आंकड्यांकडे परत एकदां पाहिलें म्हणजे जें चित्र दिसतें तें असें. मिळवित्या लोकांची धंदेवार आंकडेवारी अशी होती.

| | | |
|---|---|---|
| शेती | — | ६८% |
| उद्योगधंदे | — | १२% |
| नोकरपेशा | — | १२% |
| व्यापारउदीम | — | ५% |

औद्योगिक विकासाच्या बाबतीतहि हेंच म्हणतां येईल. साधारणतः विजेचा वापर, दळणवळणाच्या सोयी, चांगले रस्ते, रेल्वे मार्ग, बँकांची संख्या, साक्षरतेचें प्रमाण, तांत्रिक व इतर शिक्षणाचें प्रमाण, शेतकीखेरीज इतर व्यवसायांत काम करणाऱ्या लोकांचें प्रमाण, सहकारी चळवळीचें सामर्थ्य व कक्षा, शहरी जनतेच्या संख्येचें प्रमाण, मोठ्या शहरांचें प्रमाण इ. गोष्टी उद्योगप्रधानतेच्या किंवा विकसितपणाच्या कसोट्या मानावयास हरकत नाहीं. यासंबंधीं उपलब्ध असलेल्या आंकड्यांचा आणि माहितीचा अभ्यास करतांही आपल्याला असें म्हणतां येतें कीं पश्चिम महाराष्ट्राचा या तिन्हीं विभागांत औद्योगिक प्रगतीच्या दृष्टीनें पहिला क्रमांक आहे. त्याच्या खालोखाल विदर्भ व त्यानंतर मराठवाडा अशी स्थिति आहे.

**नागर-ग्रामीण** लोकसंख्या आणि **शेती-बिगरशेती** उपजीविका

| | शहरवासी | ग्रामवासी | शेतीवर जीवन | बिनशेती जीवन | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| पश्चिम महाराष्ट्र | ३५·६% | ६४·४% | ५८·१% | ४१·९% | १·९३ कोटी |
| विदर्भ | २१·५% | ७८·५% | ६९·७% | ३०·७% | ७६ लाख |
| मराठवाडा | १४·३% | ८५·७% | ७७·५% | २२·५% | ४८ लाख |
| एकूण | २९·०% | ७१·०% | ६३·७% | ३६·३% | ३·१७ कोटी |

जंगल असलेल्या जमिनीचें प्रमाण विदर्भ, पश्चिम महाराष्ट्र व मराठवाडा यांत ३२% १७% आणि २·४% आहे. पाणीपुरवठा विदर्भ आणि प. महाराष्ट्रांत ६% जमिनीला होतो, तर मराठवाड्यांत हें प्रमाण फक्त २·३% एवढेंच आहे. दोन पिकें काढल्या जाणाऱ्या जमिनीचें प्रमाण विदर्भ व प. महाराष्ट्र यांत ४% पेक्षां जास्त आहे. तर मराठवाड्यांत तें फक्त २·३% एवढें आहे.

वरील आंकड्यांकडे भागशः किंवा एकत्रितपणेंही पाहतां महाराष्ट्र हेंही भारताप्रमाणें कृषिप्रधान राज्य आहे हें लक्षांत येते. शेतींत जवळ जवळ ७० टक्के लोक गुंतलेले आहेत. शहरवासी आणि बिनशेती व्यवसायावर उपजीविका करणाऱ्यांची संख्या फार कमी आहे. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे महाराष्ट्राच्या तीन्हीं विभागांना जरी विकासाची निकड असली तरी मराठवाड्याची निकड जास्तीत जास्त आहे व त्या खालोखाल इतर दोन विभागांची आहे हें लक्षांत येतें.

म्हणून महाराष्ट्रांत करावयाच्या विकास योजनेंत प. महाराष्ट्रापेक्षांहि विदर्भ आणि विशेषतः मराठवाडा यांच्या गरजांकडे लक्ष पुरवावें लागेल. कारण प. महाराष्ट्राची व एकंदर महाराष्ट्राची खरी प्रगति विदर्भ-मराठवाड्याची प्रगति साधल्याशिवाय होणार नाहीं हें निश्चित आहे.

## आर्थिक प्रगतीची दिशा

भारताच्या किंवा महाराष्ट्राच्या बाबतींत करावयाच्या योजनेचा विचार करतांना नेहमीं सर्वप्रथम विचार कशाचा करावा लागत असेल तर तो शेतीच्या विकासाचा. कृषिप्रधान देशाचा विकास करतांना औद्योगिक प्रगतीला महत्त्व असलें तरी शेतीच्या प्रगतीलाहि जवळजवळ तितकेंच महत्त्व आहे. याचें एक कारण असें कीं बहुसंख्य लोक याच व्यवसायांत गुंतलेले असल्यामुळें या व्यवसायाचा उत्कर्ष झाल्याशिवाय त्यांचा उत्कर्ष होणें शक्य नाहीं. दुसरें म्हणजे अन्नाच्या आयातीवर होणारा वाढता खर्च, त्यामुळें होणारा आपल्या परदेशी मिळकतीचा अपव्यय, वाढत्या लोकसंख्येमुळें निर्माण होत

अनुक्रमणिका




असलेली अन्नाची वाढती मागणी यांचा विचार करतां आपल्याला अन्ननिर्मितींत स्वयंपूर्ण होणें आवश्यक आहे. त्याचप्रमाणें मोठ्या प्रमाणावरच्या औद्योगिक विकासाला लागणारी साधनसंपत्ति, भांडवल इ. आपल्याकडे कमी प्रमाणांत असल्यामुळें आणि यांच्या होऊं शकणाऱ्या विस्तारावर महत्त्वाच्या मर्यादा असल्यामुळें आणि आपल्या वाढत्या बेकारीचा प्रश्न परिणामकारक रीतीनें सोडविण्याच्या दृष्टीनें मोठे उद्योगधंदे तितके पुरे पडूं शकणार नसल्यामुळें शेतीच्या विकासाचें महत्त्व या सर्व समस्या सोडविण्याच्या दृष्टीनें फार वाढतें.

शेतीच्या विकासासाठीं भरपूर व स्वस्त पाणी पुरवठा, उत्तम रासायनिक खतें सुधारलेलीं बी बियाणें, अवजारें, चांगलीं जनावरें, अल्प व दीर्घ मुदतीचें भांडवल, कोठारें, धान्यविक्रीची व्यवस्था, स्थिर किंमती, योग्य मोबदल्याची खात्री इ. आवश्यक गोष्टी केल्या पाहिजेत सहकारी तत्त्वावरच्या शेतीचें महत्त्व जाणून फायदेशीर त्या बाबतींत तरी तिचा अवलंब केला पाहिजे. भूमिहीनांना जमीन पुरविणें किंवा जेथें उत्पादनाचे क्षेत्र संकुचित आहे तेथें तें योग्य तेवढें विस्तारणें आवश्यक आहे. जमिनीची तुकडेबाजी (fragmenation and subdivision) थांबवून अशा तुकड्यांचें एकत्रीकरण (consolidation) व्हावयास पाहिजे. जमिनीचे कमाल क्षेत्र किती असावें हें ठरविलें पाहिजे (ceilings). लहान मोठ्या स्वरूपाच्या योजना परिणामकारकपणें पुऱ्या केल्याशिवाय कृषीची समस्या सुटणें अवघड किंवा अशक्य आहे.

शेतीचा विकास म्हणजे केवळ अन्ननिर्मितीची वाढ एवढेंच नव्हें. अन्नाचें महत्त्व अजोड असलें तरीही शेतीचीं जीं इतर अंगें आहेत त्यांकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. फळफळावळ, बागाईत, भाजीपाला, जनावरांची पैदास, दुधदुभते, कोंबड्या, मेंढ्या, शेळ्या पाळणें इ. विभागाकडेही लक्ष पुरविले पाहिजे. या प्रयत्नामुळें शेतीचा पाया हा जास्त विस्तृत होऊन शेतकऱ्याचें त्यामुळें दोनफायदे होतील एक तर शेतकऱ्यांचें अगदीं तुटपुंजे असलेलें उत्पन्न त्यामुळें वाढेल व दोन - कित्येकदां अन्नधान्यांच्या किंमतींत चढउतार होऊन जी अस्थिरता निर्माण होते तीही नाहींशी होईल. यावरून शेतीची सर्वांगीण प्रगती महाराष्ट्रीय शेतकऱ्याच्या दृष्टीनें किती महत्त्वाची आहे हें लक्षांत यावें.

आपल्या पहिल्या योजनेंत अन्नधान्याच्या निर्मितीवर भर देण्यांत आला. दुसऱ्या योजनेंत शेतीचा पाया विस्तृत करण्याची दृष्टि ठेवण्यांत आली. अर्थात् खर्च पुरेसा आणि योग्य रीतीनें न केल्यामुळें स्वयंपूर्णतेचें उद्दिष्ट आपल्याला कधींच गांठतां आलेलें नाहीं, आणि आजही आपल्याला दुष्काळी परिस्थिति, भाववाढ, अन्नमोर्चे अशा प्रश्नांना देशांत ठिकठिकाणीं तोंड द्यावें लागत आहे.

वर सांगितलेले दोन्ही उद्देश—शेतकऱ्यांचें उत्पन्न वाढविणें व तें स्थिर करणें-साधण्याच्या दृष्टीनें आणखी त्यांच्या इतर उपयोगांच्या दृष्टीनें छोट्या उद्योगधंद्यांकडे आपण पाहिलें पाहिजे. छोटे उद्योगधंदे आणि कुटिर-उद्योग (cottage industries) यांचें इतर दृष्टींनीं महत्त्व असें. मोठ्या धंद्यांपेक्षां छोटे धंदे सुरू करणें हें सुलभ आहे. त्यांना गुंतागुंतीची, किंमती व दुर्लभ यंत्रसामुग्री लागत नाहीं. शेतकऱ्यांना हंगामाखेरीज जो वेळ मिळतो त्या वेळांत करतां येण्यासारखे हे उद्योग आहेत. या उद्योगांची त्यांना माहिती आहे, परंपरेनें ते त्यांच्याकडे चालत आलेले आहेत, जागच्या जागीं ते त्यांना करतां येतील. शिवाय ज्या मानवशक्तीचा वापर यांत जास्त होणार तीही आपल्याकडे विपुल आहे. या सर्व कारणांसाठीं आणि शेतकऱ्याचें उत्पन्न वाढविणें व वृत्ति (employment) वाढविणें यांचें एक हुकमी साधन म्हणून छोटे उद्योग व कुटिरोद्योग यांचेकडे लक्ष पुरविलें पाहिजे. अर्थात् हातमागाचें कापड तयार करणें यासारखा जो उद्योग आहे तो यंत्रावरील कापडाच्या स्पर्धेत टिकूं शकत नाहीं असा अनुभव आहे. म्हणून जेथें स्पर्धेचा प्रश्न नाहीं किंवा जेथें मोठ्या धंद्यांना पोषक असें उत्पादन होईल (उदा॰ कच्चे रेशीम) अशा छोट्या धंद्यांचा जास्त पुरस्कार केला पाहिजे.

शेतीप्रधान देश म्हटला कीं तो मागासलेला असें जवळ जवळ समीकरण मांडतां येईल. ही परिस्थिति नाहींशी करण्यासाठीं मोठ्या उद्योगधंद्यांचा विकास करणें हा एकमेव परिणामकारक उपाय आहे. या धंद्यांच्या विकासाला सध्यां असलेल्या मर्यादा लक्षांत घेऊनही शेवटीं असेंच म्हणावें लागतें. एकदां हे धंदे निर्माण झाले म्हणजे त्यांच्या अनुषंगानें दुसरे धंदे निर्माण होतात. वृत्ति (employment) मिळविण्याच्या संधी वाढत जातात. उत्पादन वाढतें. उत्पन्नाची पातळी वाढते. परागतीचें दुष्टचक्र ज्याप्रमाणें निर्माण होऊं शकतें त्याचप्रमाणें प्रगतीचें सुष्टचक्रही निर्माण होऊं शकेल.

कापडाच्या गिरण्या आणि साखर कारखाने आपल्याकडे आहेत. त्याशिवाय तेलधंद्याविषयींच्या योजना व्हावयास पाहिजेत. तसेंच त्याच्या साहाय्यानें निर्माण होणारे साबण, वनस्पति तूप हेही धंदे लक्षांत येतात. महाराष्ट्रांत उपलब्ध असलेली तुलनेनें मोठ्या प्रमाणावर असलेली तज्ञसंख्या लक्षांत घेतां

## गाथा सप्तशती

देवा, अन्य महिलांशीं
माझ्या पतीचा संबंध येऊं दे,
एकनिष्ठ पुरुषांना
गुण समजत नाहींत व
दोषहि उमगत नाहींत !



बाता सप्तशती : १९५९

अनुक्रमणिका

शास्त्रीय उपकरणें निर्माण करण्याच्या धंद्या-बाबतची सूचना एके ठिकाणीं करण्यांत आली आहे. विदर्भातील चांदा व भंडारा जिल्ह्यांत स्टेटाईट आढळतें. तेथें इन्सुलेटर्स व इतर विजेसाठीं लागणाऱ्या सामानाचें उत्पादन करतां येईल. मच्छीमारी, माशाचें लिव्हर ऑईल काढणें, असेही धंदे आहेत. औद्योगिक वसाहती ( Industrial estates ), औद्योगिक शिक्षणकेंद्रें, वर्क शॉप्स यांचेमार्फतही महत्त्वाचें कार्य होऊं शकेल.

औद्योगिक क्रांतीच महाराष्ट्रांत घडवून आणण्यासाठीं खूपच करतां येण्यासारखें आहे. पावसाच्या आणि नद्यांच्या पाण्याचा उपयोग चांगला करतां येण्यासारखा आहे. महाराष्ट्रांतील पूर्णा, वर्धा, पैनगंगा, वैनगंगा, मुळा, कुकडी, गिरना, वीर, खडकवासला या धरणां-विषयीं सतत मागणी महाराष्ट्रानें केलेली आहे. कोयना योजनेविषयीं आपण नेहमीं वाचतो, ऐकतो. त्याप्रमाणें पूर्णा, वीर, गिरना, खडकवासला, वारणा यांच्यावरील योजनांची कांहीं तरतूद दुसऱ्या योजनेंत करण्यांत आली आहे. याशिवाय विदर्भात कन्हान, सपना, विलोचना तसेंच पेंच, आंभोरा व आरमोरा या योजनांचा विचार व्हावयास पाहिजे. मराठवाड्यांत पैनगंगा व मांजरा या योजना हातीं घ्यावयास पाहिजेत. पण याशिवाय सर्वत्र जिल्हानिहाय लहान बंधारे व तलाव बांधून पाणी पुरवठा वाढविला पाहिजे. विशेषतः मराठवाड्यांत मोठ्या नद्या नसल्यामुळें तेथें लहान योजना मोठ्या प्रमाणावर हव्या. महाराष्ट्रांत पाणीपुरवठाच एकंदर कमी प्रमाणांत आहे. विशेषतः पूर्व महाराष्ट्रांत पाण्याच्या तुटवड्यामुळें दुष्काळाचें भय कित्येकदां निर्माण होतें. लहानमोठ्या पाणीपुरवठ्याच्या योजना हाती घेऊन या संकटाचें निवारण केलें पाहिजे.

पश्चिम घाटावर पडणाऱ्या तुफान पावसाचा उपयोग करून आपल्याला विजेची निर्मितीही मोठ्या प्रमाणावर करतां येण्यासारखी आहे. धरण योजनांचा उपयोग जल आणि विद्युत् पुरवठा असा दुहेरी होऊं शकतो. ऋद्धि शेतकऱ्याच्या घरीं पाणी भरते आणि सिद्धि विजेचा प्रकाश पाडते, उद्योग निर्मितीसाठीं शक्ति देते. पण असें नेहमींच होणें हें एकाच ठिकाणीं कालव्याच्या पाण्याची जरूरी आणि वीज वापरण्याची शक्यता आहे कीं नाहीं यावर अवलंबून आहे. उदाहरणार्थ महाराष्ट्रांत पश्चिम घाटावरचा जलस्रोत पश्चिम बाजूला सोडून तेथें वीज निर्माण करणें सोपें आहे पण कोंकणांत या पाण्याची वेगळी आवश्यकता अगर उपयोग नाहीं आणि पूर्व महाराष्ट्रांत जेथें खरोखर पाण्याची आवश्यकता आहे तेथें हें पाणी नेतां येणार नाहीं. कोजना योजनेच्या वेळीं याच विषयावर मोठा वादविवाद झाला. परंतु प्रा. एन्. व्ही. सोवनी यांनीं म्हटल्याप्रमाणें वैकल्पिक योजनांचा साकल्यानें व तौलनिकदृष्ट्या विचार केला असतां असें होण्याचें कारण नाहीं. सागराच्या उदरांत लुप्त होणारी ही अफाट जलशक्ति महाराष्ट्राच्या अनेकविध विकासकार्यां-साठीं वाकविणें शक्य आणि आवश्यकही आहे.

महाराष्ट्रभूमींत खनिजसंपत्ति बऱ्याच प्रमाणांत आहे असें भूगर्भशास्त्रज्ञांना आढळून आलें आहे. या दृष्टीनें पहातां विदर्भ हा सर्वांत समृद्ध भाग आहे. कारवार, भंडारा, नागपूर, बालाघाट, छिंदवाडा, रत्नागिरी इ. जिल्ह्यांत मँगनिजचे सांठे आहेत. पश्चिम सातारा जिल्ह्यांत लोखंड सांपडतें. बऱ्याच प्रमाणावर बेळगांव, कोल्हापूर आणि ठाणें जिल्ह्यांत बॉक्साइट सांपडतें. चांदा, अदिलाबाद, छिंदवाडा आणि यवतमाळ याठिकाणीं कोळसा सांपडतो. अदिलाबाद आणि चांदा येथील कोळशाच्या खाणीही केव्हांच चालू झाल्या आहेत. कोल्हापूर, बेळगांवच्या आसपास वीज निर्माण होऊं लागली तर तेथें मोठ्या प्रमाणावर ॲल्युमिनियमचा धंदा सुरू करतां येईल. रत्नागिरी बाजूस वाळूमध्यें टिटॅनम् तर दक्षिण रत्नागिरी जिल्ह्यांत क्रोमाइटही सांपडतें. वऱ्हाड नागपूर भागांत खनिज संपत्ति मोठ्या प्रमाणावर आहे. वीजनिर्मिती महाराष्ट्रांत सहज शक्य असल्यामुळें औद्योगिक विकासासाठीं या खनीज संपत्तीचा चांगला उपयोग महाराष्ट्राला करून घेतां येण्यासारखा आहे.

वर सांगितल्याप्रमाणें लहान उद्योगधंद्यांचें अनन्यसाधारण महत्त्व लक्षांत घेऊन त्यांनाही आवश्यक तें उत्तेजन दिलें पाहिजे. सुतारकाम, लोहारकाम, कुंभारकाम, वेत आणि बांबूचें काम, कातडीं कमावणें आणि कातडी सामान तयार करणें, तेलघाण्या, शिवणकाम, चुना आणि कोळसाभट्टी आणि शेतीला असलेले जोड धंदे यांसारखे हे अनेक धंदे आहेत.

महाराष्ट्रांत रेल्वेमार्ग १५०० मैलपेक्षांही कमी लांबीचे आहेत. विकासाच्या कुठल्याही योजनेंत वहातुक आणि दळणवळणाच्या साधनांचें फार मोठें महत्त्व आहे. या दृष्टीनें महाराष्ट्रांत नवे रेल्वे मार्ग, चांगले मोटार व गाडी रस्ते होणें अत्यंत आवश्यक आहे. कच्च्या व पक्क्या मालाच्या आणि श्रमिकांच्या वहातुकीचा खर्च कमींतकमी करणें, वहातुक सुलभ आणि जलद करणें हें औद्योगिक प्रगतीचें एक महत्त्वाचें अंग आहे. कोंकणप्रांतांत रेल्वेमार्ग पाहिजे अशी महाराष्ट्राची मागणी आहे तिचें आर्थिक प्रगतीच्या दृष्टीनें फार महत्त्व आहे. या रेल्वेसाठीं लागणाऱ्या खर्चाची रक्कम मोठी असल्यामुळें नजीकच्या काळांत तो ती भरून येणार नाहीं या भीतीनें ही योजनाच विचारांतून काढून टाकण्याचा प्रयत्न करण्यांत आला. पण प्रा. धनंजयराव गाडगीळ यांनीं एका भाषणांत सांगितल्याप्रमाणें इतक्या संकुचित दृष्टीनें या योजनेचा विचार करणें बरोबर नाहीं. दूरवर होणारे या योजनेचे फायदे लक्षांत घेतां ही योजना अवास्तव खर्चाची नसून फायदेशीर आहे हें लक्षांत येतें. कोंकण प्रांतातली रेल्वे तर व्हावयास पाहिजेच पण महाराष्ट्र इकॉनॉमिक कौन्सिलनें सुचविल्याप्रमाणें जिल्हा, तालुक्यांचीं ठिकाणें आणि महत्त्वाचीं व्यापारी पिकें निर्माण करणारीं केंद्रें याठिकाणीं रेल्वेचें जाळें पसरलें पाहिजे. इतर ठिकाणीं रस्त्यांचें जाळें विणलें पाहिजे.

औद्योगिक आणि कृषिविकासासाठीं आवश्यक अशी आणखी एक गोष्ट म्हणजे कर्जाचा पुरवठा हा मुद्दा. सध्याची परिस्थितीच केवळ लक्षांत न घेतां शक्यता (potentialities) काय आहेत हें लक्षांत घेऊन झाला पाहिजे. कारण या अभावीं वरूर तेथें मदत मिळणार नाहीं आणि महत्त्वाचीं उत्पादक कार्यें त्यामुळें

## लेखकांस सूचना

**दीपावली**साठीं अनाहूत साहित्य पाठवितांना लेखकांनीं पुरेसें पोस्टेज सोबत पाठवावें. सोबत पोस्टेज नसलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जाणार नाहीं.

अनुक्रमणिका








अडून राहतील. ऋणपुरवठा आवश्यक प्रमाणावर आणि योग्य दरानें होण्यासाठीं खेडोपाडी सरकारी आणि सहकारी बँकांची स्थापना होणें आवश्यक आहे. नवे नवे उद्योगधंदे उभारण्यासाठीं भांडवलाचा सतत पुरवठा जनतेकडून होत रहावा अशी महाराष्ट्राची स्थिति नाहीं. त्यामुळें सरकारप्रणीत उद्योगधंदेहि येथें निर्माण होण्याची आवश्यकता आहे.

तंत्रज्ञाची उणीव महाराष्ट्राला भासत नसली तरी महाराष्ट्राचा स्वतःचा असा व्यापारी वर्ग नाहीं. या महत्त्वाच्या बाबतींत महाराष्ट्राला नेहमींच हिंमतीनें आणि नेकीनें व्यापारक्षेत्रांत उत्कर्ष पावलेल्या मारवाडी-गुजराती जमातींकडे पहावें लागलें आहे. अटकेपर्यंत तलवार गाजविल्याचा अभिमान महाराष्ट्रानें नेहमींच बाळगला आहे. तो बाळगणें हें योग्य असलें तरीहि तागडीचा तोल सांभाळणें हेंहि एक कौशल्य आहे हें आपण कधींच विशेष ओळखलें नाहीं. तागडी ही सुद्धां सामर्थ्याचें प्रतीक होऊं शकते हें ओळखून आतांपर्यंत दुर्लक्षिण्यांत आलेली कनिष्ठ समजली गेलेली ही बाजू बळकट करण्याचे पद्धतशीर प्रयत्न महाराष्ट्रानें करावयास पाहिजेत. आपली रचना जोपर्यंत संमिश्र स्वरुपाची (mixed economy) राहील तोपर्यंत तरी या वर्गाचे महत्त्व फार मोठे आहे.



## वाटचाल

काय व्हावयास पाहिजे हें पाहिलें त्याप्रमाणेंच काय झालें आहे, होत आहे हें पाहणेंही महत्त्वाचें आहे.

भारताच्या पंचवार्षिक योजनेप्रमाणेंच मुंबई राज्याचीही पंचवार्षिक योजना आहे. यांतली पहिली पंचवार्षिक योजना पुरी होऊन सध्यां दुसऱ्या योजनेचा निम्मा अधिक काळ संपला आहे. या योजनांमध्यें शेती, पाणीपुरवठा व विद्युत्निर्मिती, उद्योगधंदे, खाणी, लोककल्याण, शास्त्रीय आणि औद्योगिक संशोधन, समूहविकास या निरनिराळ्या क्षेत्रांच्या प्रगतीसाठीं खर्च करण्याचें ठरलें. दुसऱ्या मुंबई-राज्य योजनेप्रमाणें १३५½ कोटी रुपयांच्या खर्चाची तरतूद करण्यांत आली.

यांतील सर्व लहानसहान योजना आणि कार्यक्रम यांचा उल्लेख येथें करणें अशक्य आहे. प्रमुख उल्लेख करावयास पाहिजे तो ३२ कोटी २८ लाख रुपयांच्या कोयना योजनेचा. पाणी आणि वीज पुरवठा या दोन्हीं दृष्टींनीं कोयना योजनेचा उपयोग फार मोठा आहे. पूर्णा योजनेचाही ( मराठवाडा ) उल्लेख करावयास पाहिजे. हीही कोयनेच्या मानानें लहान पण द्विविध योजना आहे. त्याचप्रमाणें वीर (५ कोटी रुपये), खडकवासला (८½ कोटी रुपये) गिरना (९ कोटी रुपये), बोर (१½ कोटी रुपये), नलगंगा (१½ कोटी रुपये) या आणखी कांहीं योजना. त्याचप्रमाणें पहिल्या योजनेंत सुरूं केलेल्या व दुसऱ्या योजनेंत पुऱ्या व्हावयाच्या आणि इतर : गंगापूर रानंद, वारणा, कुर्नर, दीना, बाघ, काटेपूर्णा, इतिहाडोह, घोडवैर, कृष्णा तलावाचा फाटा, पुष्पावती बंधारा, बुधियाळ तलाव, तराली बंधारा, उरमोडी, धेकू, जुई, शिवना, बेंडसुरा, कमली, तलवार, खासापूर, नलदुर्ग—इत्यादि योजना.

विदर्भांत एकंदर ७२ कोटी रुपयांची सदर्न ग्रिड योजना आहे. मराठवाड्यांत नांदेड विद्युत्योजना आहे. याशिवाय अनेक ठिकाणीं वीज निर्माण होण्याची शक्यता आहे. त्याबद्दल पाहणी चालू आहे. विशेषतः विदर्भांत पाण्याच्या सहाय्यानें वीज निर्माण करण्यासाठीं अनुकूल परिस्थीति नसल्यामुळें दगडी कोळशाच्या साहाय्यानें ही निर्मिती तेथें वाढवावी अशी सूचना आहे.

वरील योजनांतून लाखो एकर जमिनींना पाणी मिळेल व लाखो किलोवॅट्स् वीज निर्माण होईल. शेती आणि उद्योगधंदे यांच्या प्रगतींत या योजना महत्त्वाचें कार्य करतील अशी अपेक्षा आहे.

शेतीविषयक आणखीही योजना आहेत. शेतीविषयक संशोधन, सुधारलेलीं बीबियाणें, खतें, पिकांचें संरक्षण, फळें, भाज्या, ऊंसाची लागवड, कापसाची लागवड, तीळ, भुईमुग, यांचें उत्पन्न, यांत्रिक शेती जमिनीच्या तुकड्यांचे एकत्रीकरण, खारी जमीन लागवडीस आणणें, छोटे बंधारे, धान्यकोठारें आणि धान्यविक्री, औद्योगिक आणि शास्त्रीय संशोधन, शिक्षण, प्रदर्शनें, चढाओढी, जनावरांची पैदास व दूधदुभतें; शेळ्या, मेंढ्या, कोंबड्या यांची पैदास, दूधयोजना, जंगल योजना, जमिनीची धूप थांबविणें, मच्छिमारी, सहकार्य, समूह-विकास इ. योजनांची लांबलचक यादी आहे. याशिवाय शिक्षणप्रसार, आरोग्याविषयक योजना, घरबांधणी, मजूर आणि मजूरकल्याण, मागासलेल्यां जमातींना मदत इत्यादींसाठीं खर्च व्हावयाचा आहे. रस्ते बांधणें व औद्योगिक वसाहती उभारणें यांच्याविषयींही योजना आहेत.

राज्यसरकारनें प्रसिद्ध केलेल्या माहिती पुस्तकांतून मिळणारी ही माहिती व हे आंकडे फार बोलके वाटतात. पण योजनाबद्ध विकासाची ८ वर्षें पुरी होऊनही परिस्थिति मात्र तितकी आशादायक वाटत नाहीं. भाववाढ, कराचा बोजा, आवश्यक वस्तूंचा तुटवडा यांच्या कचाट्यांत सामान्य माणसाची अजूनहि बेधा उडत आहे. सामान्य माणसांकरितां, त्यांच्या कल्याणाकरितां या योजना आहेंत म्हणूनच हें अपयश महत्त्वाचें वाटतें. अपयशाचीं किंवा कमी यशाचीं कारणें अनेक आहेत. त्यांतलीं कांहीं स्वाभाविक असलीं तरी बरींच टाळतां येण्यासारखीं आहेत. यांतलीं कांहीं अशीं.

१ अल्पकालीन व दीर्घकालीन योजनांचा तोल संभाळण्यांत आलेला नाहीं.

२ समूहविकासासारख्या अयशस्वी योजनेवर मोठ्या प्रमाणांत खर्च होत आहे.

३ कूळकायदा संपूर्णपणें परिणामकारक ठरलेला नाहीं.

४ तसेंच केवळ जमिनी मिळून शेतकऱ्याचा प्रश्न सुटत नाहीं. भांडवलाचा मुख्य प्रश्न अजून सुटलेला नाहीं. पाण्याचे दरसुद्धां शेतकऱ्याच्या आवाक्याबाहेरचे आहेत. हेंच इतर बाबतींतही खरें आहे.

५. योजना ठीक आहेत. त्यांवर खर्चही व्यवस्थित होत आहे. असें गृहीत धरलें तरीही अपेक्षित फळ दिसत नाहीं. याचा अर्थ अंमलबजावणी नीट होत नाहीं हा आहे. कामांतील दिरंगाई, चालढकल, पैशाचा अपव्यय, राष्ट्रीय वृत्तीचा अभाव, अनुभवाचा अभाव इ. इ. इ. अनेक कारणें सांगतां येतील. हे आणखी इतर दोष नाहींसे केल्याशिवाय केवळ योजनेचा आराखडा आणि त्यावरील खर्च हे कांहींच करूं शकणार नाहींत.

## प्रादेशिक विचार

महाराष्ट्राच्या आर्थिक प्रगतीचा विचार करतांना भारताच्या आर्थिक प्रगतीचा मूलभूत विचार डावलावा, किंवा बाजूला ठेवावा असें कोणीच सूज्ञ म्हणणार नाहीं. उत्कर्ष ही एक अविभाज्य गोष्ट आहे. (Prosperity is indivisible) हें तर भारताच्याच काय पण जगाच्या बाबतींतही खरें आहे. हा अनुभव सूर्यप्रकाशाइतका स्पष्ट आहे. आणि सत्य आहे. परंतु त्या बरोबरच प्रादेशिक प्रगतीचा विचार करणें हेंही आवश्यक आहे हें समजावयास पाहिजे. महाराष्ट्रानें स्वतःचा सवतासुभा मांडून कांहीं एकांड्या योजना आंखाव्या असा याचा अर्थ नाहीं. परंतु सबंध देशाच्या हिताआड न येतां स्वतःच्या उत्कर्षाच्या योजना आंखणें, संबंधितांना त्या पटवून देणें व आवश्यक तेथें त्यांचें सहकार्य मिळवून त्या नेटानें पार पाडणें हेंही जरूर आहे. यामुळें महाराष्ट्राचाच (किंवा या सूत्रानें वागणाऱ्या त्या त्या राज्याचाच) उत्कर्ष होईल असें नाहीं. तर महाराष्ट्र (आणि तें तें प्रत्येक राज्य) भारताचाच एक अविभाज्य घटक असल्यामुळें शेवटीं त्यांत भारताचेंही हित आहे.

येथें भाषिक राज्याचा प्रश्न परत उद्भवतो. आर्थिक विकास होण्यासाठीं एकमतानें एकसूत्रीपणानें योजना होणें आवश्यक आहे. कारण सर्व संबंधितांच्या सहकार्या शिवाय ही योजना फलद्रूप होणार नाहीं. हें सहकार्य, हा एकोपा सांस्कृतिक आणि ऐतिहासिक परंपरा, सामाजिक दृढता आणि राजकीय भावना, भाषा इत्यादी सर्व दृष्टींनीं एकजिनसी असलेल्या स्वतंत्र भाषिक राज्यांत जास्तींत जास्त चांगल्या प्रकारें आणि सुलभतेनें होण्याची खात्री असल्यामुळें स्वतंत्र संयुक्त महाराष्ट्राची निर्मिती ही आर्थिक दृष्ट्याही आवश्यक आहे असें दाखवितां येतें. संयुक्त महाराष्ट्र वेगळा झाला नसला तरी मराठी बोलणारे सर्व समाज एकत्र आलेच आहेत असें समाधान मानणें बरोबर नाहीं. कारण एकदा द्विभाषिक राज्य आलें म्हणजे दुसऱ्या राज्याच्या गरजांचा प्रश्न आला आणि परत दोहोंचा एकत्र विचार करण्याची आवश्यकता निर्माण झाली. असें झालें म्हणजे तडजोड होऊन जो आर्थिक विकास होईल (किंवा होणार नाहीं!) त्याचें आणि वेगळ्या मराठी राज्यांत जो आर्थिक विकास होऊं शकेल त्याचें स्वरूप वेगळें असेल. म्हणून आतां काय संयुक्त महाराष्ट्र मिळालाच. आपलें ध्येय साध्य झालेंच आहे. सगळें आलबेल आहे. असें (प्रा. ना. सी. फडके इ. लोकांप्रमाणें) मानणें हें अडाणीपणाचें लक्षण आहे. संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीला राजकीय महत्त्व आहेच पण आर्थिक महत्त्वही आहे हें विसरतां येत नाहीं. • ••









# ( सरळसोट आणि सुप्त )

— वसंत सबनीस

उंदीर मी देवा । क्षुद्र तुझ्या दारीं
कृपा असो यावी । भक्तावरी ॥
जनीसवें देवा । दळतांना पीठ
तुम्ही नाहीं नीट । पाहिले गा ॥
होतो कोपऱ्यांत । बिळाच्या तोंडाशीं
तुझी दृष्टी नाहीं । वळली गा ॥
दुकानीं मी केला । तुक्याच्या हो वास
परि तेथें ध्यास । तुमचाच ॥
खोबऱ्याचा रोज । करतांना अंत
संत समागम । तुकोबाचा ॥
चावतांना चिंधी । नामयाच्या घरीं
तुझें नाम देवा । कानीं आलें ॥
करा निष्कंटक । देवा माझी वाट
लावूनीया वाट । मांजरांची ॥

माझा मित्र मनू माने उंदरावर अशा प्रकारें ध्रुशी एवढ्या मोठ्या कविता करतो आणि मला ऐकवतो. तो उंदरासारखा केव्हां घरांत येतो तें मला कळत नाहीं आणि मग माझा नाइलाज होतो. त्याच्या उंदरावरच्या कविता ऐकल्या कीं माझ्या डोळ्यापुढून असंख्य उंदीर पळत जातात. काळे उंदीर, भुरके उंदीर, करडे उंदीर, फडें उंदीर, उदी उंदीर, छोटे उंदीर, मोठे उंदीर, लठ्ठ उंदीर आणि मठ्ठ उंदीर...मग मला सगळे उंदीर आठवतात...

तसें उंदराचे आणि माझे संबंध बऱ्यापैकीं आहेत. मी त्यांना मारतो, हुसकतो तरी पण मी त्यांचा मांजराइतका वैरी नाहीं, हें माझ्या घरांतला कुठलाही उंदीर सांगू शकेल. मी त्यांना खात नाहीं याची त्यांना खात्री आहे. उलट खाण्याच्याबाबतींत उंदरानींच माझ्यावर मात केली आहे. उंदरानीं माझें काय खाल्लें नाहीं ? माझें अन्न खाल्लें, धान्य खाल्लें, कपडे खाल्ले, नोटा खाल्ल्या आहेत, गाद्या चावल्या आहेत, उशा खाल्ल्या आहेत आणि माझ्या गांवीं घरांत असलेली पेंडही अगदीं आपल्या बापाचीच पेंड आहे असें समजून खाल्ली आहे. वास्तविक मी उंदरांची कणभरही गय करू नये इतकें त्यानीं माझे अपराध आणि नुकसान केलें आहे. तरी पण मला त्यांच्याबद्दल चीड येत नाहीं. मी कांहींशा उदार मनानेंच उंदरांना वागवतो. म्हणूनच माझ्या घरांत मांजराचा वावर नाहीं. कारण उंदराच्या निमित्तानं घरांत येणारें मांजर, आजार गेला तरी औषध पाजीत राहणाऱ्या वैद्यासारखे महाग लागते.

उंदरांचं व्यक्तिमत्व प्रभावी असावं असं मला राहून राहून वाटतं. कारण माणसाचा प्रभाव उंदरावर पडून उंदीर माणसासारखें वागूं लागल्याचें मी कुठेंच पाहिलें नाहीं. पण अनेक माणसें मात्र उंदरासारखीं वागतांना मी पाहिलीं आहेत. लांब कशाला—माझ्या आयुष्यांत आलेल्या स्त्रिया—अर्थात् त्यांची संख्या उंदरांच्या मानानें अगदीच अल्प आहे—उंदरासारख्याच हळूच माझ्या आयुष्यांत शिरल्या, उंदरासारख्याच लुकलुकत्या डोळ्यांनीं आणि माना वेळावून पहात राहिल्या आणि बघतां बघतां माझें हृदय आणि आयुष्य कुरतडून उंदरासारख्या निसटून गेल्या. फरक एवढाच कीं, त्यानीं कुरतडलेलें हृदय आणि आयुष्य मी पुन्हा रफू करून वापरू शकलों—पण उंदरानीं कुरतडलेले कपडे व नोटा मात्र मी वापरू शकलों नाहीं. आतां त्या कुरतडीचा मागमूसही राहिलेला नाहीं ही



अनुक्रमणिका

गोष्ट वेगळी ! तथापि त्यांच्या आठवणींचे उंदीर मात्र कधींतरी सांधीकोपऱ्यांत खुडबूड करतात—पण शुक् केलं कीं पळून जातात !

अशा ह्या स्त्रिया गेल्या आणि त्यांच्या आठवणीही गेल्या. पण उंदीर मात्र मला सोडून गेले नाहींत. मी घरें बदललीं, गांवें बदललीं पण त्याबरोबर उंदीरही बदलले. एखाद्या शापाप्रमाणें ते माझ्या मागे लागले आहेत. जेथें उंदीर नसतील असें घर शोधावे आणि माझ्या मागून चारसहा दिवसांतच नातेवाइकांच्या हक्कानें उंदरानीं माझ्या घरांत येऊन विन्हाड करावे, असें कितीतरी वेळा घडलें आहे. आजपर्यंत बहुतेक घरांत मी माझें आणि उंदरांचेंही भाडे देत आलों आहे. अर्थात् कांहीं उंदीर माझ्या घरांत रहात नव्हते. पण रात्रीं अगदीं ड्यूटीवर आल्यासारखे नेमानें खिडकीच्या शटर्समधून घरांत शिरायचे. नव्या घरांत बरेच दिवस उंदरांचें अस्तित्व जाणवत नाहीं. पण एकादे दिवशीं स्वयंपाक घरांतल्या भांड्याच्या शेल्फमधून कांहींतरी सटकन् पळतें. भास होतो सावलीचा पण मी डोळे झाकून ओळखतो कीं हा उंदीर ! मला आता उंदरांचा इतका सराव झाला आहे कीं त्यानें थोडीशी जरी हालचाल केली तरी मला त्याची चाहूल लागते. अर्थात् अजुन मला उंदरांचा वास मात्र यायला लागलेला नाहीं—तोही पुढें मागें येईल कदाचित्—नाहीं कसें म्हणावे ? थोड्याच दिवसांत त्यांची संख्या वाढू लागते. आणि मग तपेल्यांत, पातेल्यांत, डब्यांत, डब्यामागें उंदीर दिसू लागतात. उंदरांपेक्षा बायकोची धावपळ वाढते. शिव्यांच्या धोंड्यांनीं उंदीर जात नाहींत असें पाहिल्यावर ती लाटण्यानें त्यांना हुसकू पहाते. पण उंदीर दाद देत नाहींत. मग ती तशीच लाटणं घेऊन तावातावानें माझ्याकडे येते आणि मी ओळखतो कीं आपल्या उंदीर-कर्तव्याची वेळ आली आहे. मग शांतपणें मी उंदरांचें निरीक्षण करतों. त्यांची संख्या किती आहे याचा अंदाज बांधतो. कारण उंदीर दोनच असले तरी ते इतक्या चपळाईनें अनेक ठिकाणीं धावतात कीं दहा उंदीर असावेत असा भास होतो. सगळेच उंदीर आफ्रिकन माणसासारखे सारखेच दिसत असल्यामुळें तोच उंदीर पुन्हा पुन्हा मोजला जातो.



लघुकथा लिहिताना आतां तंत्र लागत नाहीं असें जाणते लोक म्हणतात. पण उंदीर मारायला तंत्राची अजून आवश्यकता आहे. माझें विशिष्ट तंत्र मी वापरतो. उंदरांच्या संख्येचा अंदाज घेतल्यावर मी शांतपणें उठतो. एका हातांत चप्पल व एका हातांत उलटा झाडू घेऊन मी गुपचूप आपल्या जागेवर पुतळ्यासारखा बसून राहतों. उंदीर अडचणीच्या जागीं गेला तर त्याला तिरकी चप्पल मारून घायाळ करायचा आणि मग झाडूनें झोडपायचा ! अर्थात् या तंत्रामुळें उंदरांपेक्षां झाडूच जास्त निकालांत निघाले ही गोष्ट वेगळी. पण उंदीर मारण्याचा एकदां कैफ चढला कीं झाडू म्हणजे किस झाड की पत्ती अशी माझी भावना असते. कैकवेळां एकेका उंदरानें माझें दोन-दोन तीन तीन झाडू निकालांत काढले आहेत. मी हरतों पण हटत नाहीं. मी तटस्थ बसून उंदरांच्या हालचालींचें निरीक्षण करतों. या पहिल्या फेरींत उंदीर सांपडत नाहीं. फक्त त्याचे जाण्या-येण्याचे मार्ग माहीत होतात. उंदरांनीं अनंत फंदींचा फटका खाल्ला नसला तरी ऐकला असला पाहिजे. कारण तो सहसा 'शॉर्ट मार्ग' सोडीत नाहीं. ज्या मार्गानें तो घरांत आला असेल त्याच मार्गानें तो बाहेर जातो. कोंडींत सांपडल्याशिवाय तो दुसरा मार्ग धुंडाळीत नाहीं. त्याच्या पळण्याच्या ढंगावरून तो सरावलेला आहे कीं नाहीं हें समजू शकते. सरावलेला उंदीर अगदीं आत्मविश्वासानें ठराविक टप्पे घेत घराबाहेर पळतो. पण नवा उंदीर बावचळून वेड्यावाकड्या पळतो—भलतीकडे लपू पाहतो—चढू पाहतो आणि बेफिकटपणें प्रेम करणाऱ्या एखाद्या कच्च्या तरुणासारखा चटकन् सांपडतो.

उंदराच्या अकलेंतील एक उणीव म्हणजे त्याला आपल्या शेपटीचा पडणारा विसर. मोठ्या अक्कलहुशारीनें लहानशा जागेंत आपलें शरीर तो लपवून ठेवतो; पण आपली शेपटी गवाक्षासारखी खालीं लोंबत आहे हें त्याच्या लक्षांतहि येत नाहीं ! परंतु त्याचें चापल्य सुंदर तरुणीच्या डोळ्यांनाही लाजवितें. प्रेमाचे फसवे खेळ खेळणाऱ्या तरुणींनीं चंचलता शिकावी उंदरापासून !

उंदीर माझ्या टप्प्यांत आल्याशिवाय मी सहसा त्याच्यावर हात टाकीत नाहीं आणि ज्यावेळीं मी हात टाकतों त्यावेळीं त्याला मार बसतोच असेंही नाहीं. नेम चुकणं हा तर माझा नेमका शौक बनला आहे. आणि म्हणूनच तरुणांना लष्करी शिक्षण आवश्यक आहे असें मला नेहमीं वाटतें. माझे आयुष्यांत पुष्कळ नेम चुकले असल्यामुळें उंदरावरचा नेम चुकला तर त्यांत कांहींच विसंगत वाटलं नाहीं. मी सारे नेम धरून चप्पल मारतो पण उंदीर सरकतो आणि माझा चेहरा मात्र खेटर मारल्यासारखा होतो असें प्रेक्षकांचें मत आहे !

माणसाबद्दल उंदरांमध्यें काय गैरसमज आहेत हें मला माहीत नाहीं. पण माझ्या मनांत उंदरांबद्दल अनेक गैरसमज होते. त्यांतलाच एक म्हणजे उंदीर निर्बुद्ध आहे हा होय ! उंदीर अतिशय चलाख आहे. एवढेंच नव्हे तर तो हेरकी आहे. तो एखाद्या मोक्याच्या जागीं लपला तर तुम्ही कितीही जंगजंग पछाडले तरी तो तेथून बाहेर येणार नाहीं. शेवटीं तिथं तो नसावाच अशी तुमची खात्री होते आणि तुम्ही नाद सोडून देता. तो तिथेंच असतो आणि तुमची जिरवतो.

अभिनयाच्या बाबतींत तर तो नामांकित नटनटींना मागे टाकील. तो माणसाच्या तावडींत सांपडला आणि आपली आतां धडगत नाहीं याबद्दल त्याची खात्री पटली कीं तो लहानशा तडाख्यानेंच खालीं पडतो आणि मेल्याचें सोंग घेतो. मरणाचा अभिनय तो इतका नाट्यपूर्ण व बेमालूम करतो कीं मारणाराचा हात थबकतो. मेलेल्याला मारण्यांत माणसाला भूषण वाटत नाहीं हें त्याला माहीत असावे. आपण एका फटक्यांत उंदीर मारला याचा अहंकार माणसाला सुखावतो आणि माणूस गाफील होतो हेंहि तो जाणून असतो; आणि म्हणूनच तो इतक्या उत्कृष्टपणें मरतो कीं एखादा अस्सल

नटसुद्धां रंगभूमीवर इतक्या कौशल्यानें मरणार नाहीं ! शेवटीं तुमच्या अहंकारी गाफीलपणाचा फायदा घेऊन उंदीर निसटून जातो.

माणसाची धाव विळापर्यंत असते हें ह्याला पुरतेपणीं ठाऊक आहे. माणूस कोणत्या मर्यादेपर्यंत आपला पाठलाग करील हेंहि त्याला ज्ञान असते. तें लक्षांत ठेवूनच तो आपले पवित्रे ठरवीत असतो. तुम्ही कपाटाच्या खालून काठीनें त्याला ढोसत राहता—अगदी सर्व बळ एकवटून ढोसत राहता आणि तो अलगद कपाटाच्या वरच्या टोकावर बसून शांतपणें तुमच्याकडे बघत असतो आणि तुम्हाला मोरू बनवतो ! तुम्ही वर फटका मारीपर्यंत तो तुमच्या पायांमधून निसटून जातो.



माझें लग्न होऊन थोडेच दिवस झाले होते. अजून भांड्यांचीं बुडेंही काळीकुट्ट झालेलीं नव्हती. रविवारची दुपार असावी. भर दुपारीं चार उंदीर घरांत शिरले. नव्या संसाराच्या कर्तेपणाचा अहंकार ताजा होता. त्यांची दखल घेणें भाग होते. उलटा झाडू आणि चप्पल घेऊन मी रणांगणांत उतरलों. बराच वेळ झटापट झाली. घराच्या तीन्ही खोल्यांत मी आणि उंदरानीं हैदोस घातला. एकही उंदीर मार खाईल असें वाटेना. चार उंदरांच्या हालचालीं-वर नजर ठेवायची म्हणजे सेनापतीचें चातुर्य अंगीं लागतें. मी घामानें निथळत होतों. बाहेरच्या खोलींत गनिमी युद्धाला तोंड लागलें होतें. तेवढ्यांत दार वाजलें. शेजारचीं कार्टीं यावेळीं घात करणार म्हणून मला राग आला. हातांत चप्पल आणि झाडू घेऊन जरा रागानेंच मी दार उघडलें. दारांत एक सुंदर तरुणी उभी होती. माझ्या अंगावर निकर, बनियन आणि घाम. हातांत अमोघ शस्त्रं ! तिनं माझ्याकडं अशा कांहीं चम-त्कारिक नजरेनं पाहिलं कीं माझ्या हातांतून चप्पल आणि झाडू गळून पडला. उंदरासारखा अंग चोरून मी दारांत उभा राहिलों. पण मी, कोण म्हणून विचारायच्या आंतच ती तरुणी अशा कांहीं झडक्यानें मागे फिरली कीं मी सर्द होऊन बघतच राहिलों. मला उंदरांचा इतका संताप आला कीं त्याना खाऊ कां गिळू असें मला झालें. आयुष्यांत उंदीर खावासा वाटण्याचा

तेवढाच एक प्रसंग ! नंतर मला कळलें कीं ती माझ्या बायकोची मैत्रीण होती आणि मुद्दाम नवा संसार पहाववास आली होती. पण तिचं माझ्याबद्दल, माझ्या संसाराबद्दल आणि बायकोच्या भवितव्या-बद्दल कांहीं तरी भयानक मत झालं एवढं मात्र खरं. कारण माझं डोकं नॉर्मल नसावं असंही ती कुणाजवळ तरी बोलल्याचें माझ्या कानीं आलं. पण त्या महिलेचा गैरसमज अजूनपर्यंत मी दूर करूं शकलों नाहीं, याची मात्र हळहळ वाटते. तेव्हांपासून एक मात्र झालें कीं मी दिवसा उंदरांच्या वाटेला जात नाहीं. दिवसा मी युद्धबंदी जाहीर केली आहे !

उंदरांबद्दल मला जवळीक वाटतें याचें कारण उंदराच्या शिकारींत विनोदाचा भाग जास्त असतो. उंदराच्या शिकारीइतकी विनोदी शिकार दुसरी कुठलीच नसेल. माझ्याकडे एक पाहुणे आले होते. सज्जन होते विचारे. एके दिवशीं जेवून आराम करीत होते. मी बाहेरच्या खोलींत येत असतांना मला दाराच्या मागें एक उंदराचें पोर लुडबुडतांना दिसलें. मी सहज दार हलवलें. त्याबरोबर तें पोर बाहेरच्या खोलींत पळालें. नव्यानेंच घरांत आलेलें दिसत होतें. मी शुक्शुक् केल्याबरोबर तें इकडे तिकडे धावलें आणि पटकन् पाहुण्यांच्या लफ्फेदार पायजम्यांत शिरलें. पाहुणे ताडकन् उडी मारून उठले आणि तोंडानें 'अरे हे काय ? हे काय ?' म्हणत पायजमा झटकूं लागले. तें पोर पायजम्याच्या एका पायांतून आंत गेलें आणि दुसऱ्या पायांतून बाहेर पडून पळून गेलें. अजून मला तो प्रसंग आठवला कीं हसू येते आणि त्या पाहुण्यांची विनोदी उडी डोळ्यांपुढें उभी राहते.

अगदीं परीटघडीच्या चेहेऱ्याची माणसें सुद्धां उंदरामागें लागलीं कीं स्त्रीमागें फिरणाऱ्या प्रेमिकासारखी विनोदी दिसतात. उंदराची शिकार करण्यांत विनोद आहे हं तर खरेंच पण शिकार पाहण्यांत अधिक विनोद आहे. उंदीर मारतांना माणसें उंदरासारखीच होतात. पळतात काय, धावतात काय, उड्या काय मारतात, सामानावर काय चढतात—अगदीं प्रेमांत पडल्यासारखी बेभान होतात !

आमच्या शेजारीं औट जगोबा नांवाचे गृहस्थ रहात असत. म्हणजे त्यांचं नांव होतं जगोबा कुलकर्णी. परंतु त्याला प्रत्येक बाबतीत 'आउट' म्हणायची संवय. तुम्ही विचारलंत 'काय जगोबा, चहा घेणार ?' जगोबा म्हणेल, 'छे बुवा ! आपण चहातनं औट आहोत !—'

'काय जगोबा, आज रजा वाटतं.'

'हो—आज ऑफिस औट.'

आळींतले सर्व लोक त्याला औट जगोबा म्हणायचे. नवराबायको दोघच. मुलं 'औट'. बरेच दिवस जगोबाच्या घरांत रात्रीं अपरात्रीं धावपळ चालायची. काय प्रकार आहे तें आम्हाला कळेना. त्याच्या शब्द ऐकूं यायचे हुलकावणी द्या—हुलकावणी द्या ! थोड्या वेळानें जगोबा ओरडायचा 'औट'. मला कळेना—ही नवराबायको रात्रीं घरांत खो खो खेळतात कीं काय ? बरं, रात्रीच्या वेळीं त्यांच्या घरांत जायचं तरी कसं ? त्यांचा काय आणि कसला खेळ चालला असेल कुणी सांगावं ? ह्या प्रकाराचा तपास लावण्याचा मी निर्धार बायकोला बोलून दाखविला पण बायकोनं मोडता घातला त्यामुळं मी 'औट' झालों.

शेवटीं एके दिवशीं जगोबा मध्यरात्रीं धाडकन् दार उघडून बाहेर पडला आणि 'औट' 'औट' म्हणत धावत येऊन त्याने आमच्या दारावर दोन चार काठ्यांचे तडाखे लगावले. मी दार उघडून बाहेर पाहिलें तों धोतराचा ओचा खोवलेला उघडाबंब जगोबा हातांत एक फळकूट घेऊन घामेजलेल्या शरिरानं आमच्या दारासमोर उभा होता.

"काय हो जगोबा, काय झालं ?"

"उंदराला औट करणार होतो बघा, पण बेटा थोडक्यांत निसटला—अहो फार छळतात हे राक्षस—"

"म्हणजे तुम्हीं रोज रात्रीं जी धावपळ करता—"

"ती उंदरांना औट करण्यासाठीं—तुम्हाला काय वाटलं मी बायकोला औट करतो—भले शाबास !"

"तसं नाहीं; पण तुमच्या सौभाग्यवती 'हुलकावणी द्या' असं म्हणत असतात—"

"असं असं—ते म्हणता होय—ती उंदरांना हुलकावणी द्या म्हणून मला सूचना देत असते. अहो, उंदीर मारणं म्हणजे काय सोपी गोष्ट आहे ? त्याला हुलकावणी द्यावी लागते, दबा धरून बसावं लागलं, झोपेचं सोंग घ्यावं लागतं—

"अरे, मग सापळे का नाहीं लावीत ?"

"सापळे न् भोपळे लावून उंदीर औट होतात होय ? अहो अणुयुगांतले हे उंदीर तुमच्या त्रेतायुगांतल्या सापळ्यांना दाद देणार होय ? म्हणून त्यांना औट करायचा एवढाच एक मार्ग आहे."



"पण हें असं किती दिवस करीत बसला ?"

"मी आणि उंदीर आहेत तोंपर्यंत. दोघांपैकी एक औट झाला कीं संपलं—पण आमच्या ह्या प्रकारानं तुमची झोप मात्र औट झाली—माफ करा. झोपा तुम्ही—आमचं हें चालायचं असंच—"

तेवढ्यांत सौ. जगोबा दारांत आल्या आणि म्हणाल्या, "ऐकलत कां, आणखीन दोन मोठे उंदीर आहेत पलंगाच्या खाली."

'औट' जगोबा तीरासारखा धावला. मीही त्याच्या मागोमाग गेलो. पलंगावर गाद्या घातल्या होत्या कीं गाद्यावर पलंग ठेवले होतें हें सांगणं कठीण होतं. ट्रंका, रद्दी, कपाट, बादल्या, डबे ह्या सर्वच वस्तू स्थानभ्रष्ट होऊन भ्रमिष्टासारख्या कुठतरी पडल्या होत्या. त्यांतून मोकळ्या राहिलेल्या जागेवर मोठ्या चलाखीनं जगोबा टुणटुण उड्या मारीत जात होता. मोठ्या कावेबाजपणानें काठीनं पलंगाखाली ढोशीत होता. मधूनच ट्रंकेवर चढत होता, मधूनच बैठक मारीत होता, वाकून बघत होता, जमिनीसपाट होऊन पलंगाखाली डोकावत होता, मधूनच धोतर आवळीत होता, पलंगावरून खाली उड्या मारीत होता, काठीचा तडाखा मारून 'औट ?' म्हणून आपणच प्रश्न करीत होता आणि आपणच 'नो, अजून औट नाहीं' अशी त्यांची उत्तरें देत होता. शेवटीं जगोबा पलंगाखालीं वाकला असतांना त्या दोन्ही उंदरानीं पलंगावर चढून जगोबाच्या पाठीवर धडाधड उड्या मारल्या व पोबारा केला. जगोबा 'औट' होऊन पलंगाखालून सरपटत बाहेर आला.

तरी पण जगोबाचा हा औट घटकेचा खेळ बरेच दिवस चालूच होता.

तसं पाहिलं तर माणसाचे आणि उंदराचे संबंध घरोब्याचे आहेत हें कुणालाही अमान्य होणार नाहीं. उंदीर माणसाच्या घरांत बिळं करतात आणि माणसें उंदरांच्या बिळा समोर घरें बांधतात. तेव्हां माणसाच्या जीवनांत—निदान घरगुती जीवनांत उंदराला निश्चित स्थान आहे. आणि म्हणूनच तो जीवनाच्या अनुषंगानं काव्यांतही घुसला आहे. मनू माने म्हणतो कीं मराठी कवितेंत उंदीर फार झाले आहेत. मला तरी ते दिसत नाहींत. पण मनू ठासून सांगतो कीं, ओल्या पिपांत ते मेल्यापासून त्यांनीं कवितेंतच बिळें केलीं आहेत. त्याच्या मतें मराठी कवितेंत सुप्त उंदीरता फार आहे. (हें ऐकल्यापासून मला श्रीखंडांत उंदीर निघाल्यासारखें झालें.) पण तो मला ती अट्टाहासानं दाखवून देतो. तो म्हणतो कीं, एक तर उंदरांचा विपुल पैदाशीचा गुण कवितेनें घेतला आहे. दुसरी गोष्ट अलिकडच्या कवितेतील कांहीं ओळी अर्धवट वाटतात आणि पुढें त्या कुरतडल्यासारख्या दिसतात ! तिसरी गोष्ट—कवितेची पहिली ओळ वाचतांच ही कविता आपल्याला कळणार रे कळणार असे वाटतें न वाटतें तोंच उंदरासारखी अर्थ आशयासह डोळ्याखालून निसटते हा उंदराचाच गुण नाहीं काय ? कवितेचा मुख्य आशय दडवून ठेवून एकादीच अर्थवाही ओळ मधेंच शेपटासारखी लोंबकळत ठेवण्याचें कसब मराठी कवितेनें कुणापासून घेतले ?

मनू मानेला मान हालवण्या खेरीज मी कांहींच उत्तर देऊं शकत नाहीं. तो म्हणतो सुप्त उंदीरता कवितेंत नको. सरळसोट उंदीर येउं द्या. तो खिशांत हात घालतो. बहुतेक उंदीर काढणार असें वाटतें. पण काढतो कविता आणि लागतो म्हणायला—

मी कुणाचा दीर आहे—मी कुणाचा धीर आहे—  
आणि कांहीं सांगताती मीच वेडा पीर आहे  
सत्य आहे ज्ञात मजला मी कुणाचा दीर नाहीं  
धीर नाहीं वीर नाहीं मी मुळीही तीर नाहीं  
एक मित्रा खीर वेडा फक्त मी उंदीर आहे  
आणि माझ्या लोचनीं या वेदनेचें नीर वाहे

मनू मानेचीं विधानं मी मान्य करतों ती त्यानं आणखी कविता म्हणू नयेत म्हणून ! आणि मग माझं मलाच वाटू लागतं कीं उंदरापेक्षां आपण फारसे वेगळे नाहीं. सापळ्यांत सापडलेल्या उंदराला सापळ्यांत अडकल्याच्या दुःखापेक्षां सापळ्यामुळें आपलें मांजरा-

(पान ५० वर चालू)



अनुक्रमणिका

इंग्रजी अमलापासून महाराष्ट्रांत एक सामाजिक स्थित्यंतर सुरू झालें. परिस्थितीबरोबर समाजधुरीणांनींहि त्याला रेटाच हातभार लावला. आचार-विचारांतील क्रांति फार झपाट्यानें झाली. आणि गेल्या महायुद्धानंतर तर हें सामाजिक परिवर्तन फार झपाट्यानें झालें. प्रा. न. र. फाटक यांच्यासारख्या विचारवंतानें या परिवर्तनाचें केलेलें हें मार्मिक विश्लेषण —



# आमची सामाजिक क्रांति

— न. र. फाटक

गेल्या शतकाच्या पहिल्या पंचविशींत महाराष्ट्रामध्यें ब्रिटिशांचें राज्य सुरू झाल्यानंतर त्यांचे कायदे, त्यांचे कोर्टांतील निकाल, त्यांचे विद्यादान, त्यांच्या सामाजिक चालीरीति, ख्रिस्ती मिशनऱ्यांचा धर्मप्रसार इत्यादि कित्येक कारणांनीं महाराष्ट्रीय समाजांत जें प्रथम हळूहळू व मागून वेगानें परिवर्तन घडत गेलें, त्याचें दिग्दर्शन येथें करावयाचें आहे. इंग्रजांच्या आधीं मुसलमान, पोर्तुगीज यांनीं महाराष्ट्रांत राज्यें आरंभलीं; त्यापैकीं मुसलमानांचीं बहामनी राज्यें, मराठेशाहीच्या उदयापुढें साफ लोपलीं पण पोर्तुगीजांचें राज्य गोव्याच्या लहानशा टापूंत शिल्लक राहिलें. बहामनी राज्यामागून कालान्तरानें मोगलांच्या वर्चस्वाखालीं महाराष्ट्राचा कांहीं भाग गेला. परंतु मुसलमान व पोर्तुगीज या राज्यांच्या प्रभावानें विशेष स्वरुपाचे फेरफार हिंदु समाजामध्यें अंमलांत आले नाहींत. पोषाख, खानपान, कांहीं अंशीं रहाणी, शिष्टाचार वगैरे व्यवहारांत मुसलमानांच्या संसर्गानें हिंदुंच्या वरच्या वर्गांत फेरफार झाले, परंतु धार्मिक आचार विचारांना इस्लामी राज्यानें मोठासा धक्का बसला नाहीं. उदाहरणार्थ बायकांच्या सती जाण्याच्या चालीकडे पाहिल्यास अकबरानें ही चाल बंद पडावी म्हणून प्रयत्न केला. त्यापूर्वीं पोर्तुगीज राज्यकर्ते सती जाण्याला प्रतिबंध करीत होते. तथापि या प्रयत्नांना सार्वत्रिक यश येण्याइतकी लोकजागृति झालेली नसल्यानें हे प्रयत्न बहुतांशीं वाया गेले, अशीच इतिहासाची साक्ष आढळते.

इंग्रजांनीं लोकांना शिक्षण देण्याचा मार्ग स्वीकारल्यामुळें सामाजिक व्यवहारांत क्रांति घडून येण्याला मदत झाली. वस्तुतः इंग्रज राज्यकर्ते अठराव्या शतकाच्या शेवटीं शेवटीं कित्येक समाजिक दुराचारांची हकालपट्टी कायद्याच्या सहाय्यानें करूं लागले होते. एकोणिसाव्या शतकाच्या सुरवातीस त्यांचें राज्य साऱ्या भारतांत स्थिरावण्याचा योग आल्यावर त्यांनीं समाजांत क्षोभ उत्पन्न होईल, असे कायदे अस्तित्वांत आणले. १८२९ चा सतीच्या बंदीचा कायदा हें क्षोभकारक कायद्याचें एक उदाहरण आहे. या काळांत वृत्तपत्रें चालू झालीं होतीं. सभा भरवून निषेध किंवा पुरस्कार व्यक्त करण्याची जनतेला संवय लागली होती. लोकांतर्फे या कायद्याचा जसा निषेध तसा पुरस्कारहि वृत्तपत्रें, अर्ज व सभा या साधनांच्या द्वारें सरकारपुढें आला. परंतु माणुसकीला कमीपणा आणणारी ही स्त्रियांच्या सहगमनाची चाल इंग्रजांनीं नामशेष करून टाकली. १८५७ च्या शिपाईगर्दींपर्यंत इंग्रज राज्यकर्ते अधूनमधून असा समाजाच्या परंपरागत दुष्टचालीरीतींचा नायनाट करण्यासाठीं झटत होते. शिपाईगर्दीनंतर त्यांनीं कुणाच्याहि धर्माला स्पर्श करावयाचा नाहीं असा नियम अंगीकारला व सामाजिक परिवर्तनाला सरकारी प्रोत्साहन मिळेनासें झालें तरीसुद्धां संमतिवय किंवा अंतर्जातीय विवाह यासंबंधाचे कायदे इंग्रजांनीं जन्मास घातल्याचे तुरळक दाखले दृष्टीस पडतात. इंग्रजांच्या राज्यकर्तृत्वांत सामाजिक स्थित्यंतर घडविणाऱ्या संकल्पांना १८५७ नंतर अवकाश नसला तरी त्यांनी देऊं केलेल्या शिक्षणाच्या परिणामीं असें स्थित्यंतर चालू राहिलें.

इंग्रजांच्या मुंबई राज्यांत जें शिक्षण सुरू झालें, त्यांत धर्माच्या अभ्यासाचा अंतर्भाव नव्हता. त्यांनीं आंखलेला अभ्यासक्रम शिकणारांच्या बुद्धींत आमूलाग्र स्थित्यंतर निर्माण करणारा होता. त्यामुळें धार्मिक व सामाजिक चालीरीतींची इष्टानिष्टता पारखण्याचें काम विद्यार्थीवर्गांत आपोआप सुरू झालें. इंग्रजीचें शिक्षण घेणारे पूर्वीप्रमाणें धार्मिक आचारांना मानीत नाहींत, त्यांना पुष्कळसे धार्मिक आचार थोतांडाप्रमाणें टाकाऊ वाटतात, अशी हाकाटी शिकणारांच्या घरांतील वडील मंडळी १८४० च्या पूर्वीच करूं लागली होती. मुलांप्रमाणें मुलींच्या शिक्षणालासुद्धां अवकाश असावा, हें पाहून परंपरागत धर्माची बळकट श्रद्धा असणारांना विलक्षण चीड आल्याचा मजकूर तत्कालीन स्त्रीशिक्षणाच्या कैवाऱ्यांनीं व शिक्षण घेतलेल्या चार दोन स्त्रियांनीं लिहून ठेवलेला आहे. मुलींना शाळेंत पाठविणारांचा समाजानें बहिष्काराच्या रूपानें प्रत्यक्ष छळ केल्याचा वृत्तांत उपलब्ध नसला तरी शाळेंत जाणाऱ्या मुलींचा उपमर्द करणारा धर्माभिमान गेल्या शतकाच्या अखेरपर्यंत प्रत्यक्षपणें व त्यानंतर बरींच वर्षें अप्रत्यक्षपणें अनुभवास येत असल्याचा पुरावा पुष्कळच काढून दाखवितां येईल. मुंबईस स्त्रीशिक्षण

अनुक्रमणिका

जेव्हां सुरू करण्यांत आलें तेव्हां शाळेंत जातांना व येतांना मुलींना फार त्रास सोसावा लागत असे. शिक्षण म्हणजे चारित्र्यहानीचा पाया अशी सामान्य जनतेची बळकट समजूत होती. तेव्हां निरोधनाचा ( पिकेटिंग ) निषेध-दर्शक उपाय सामाजिक व राजकीय जीवनाला अवगत नव्हता. कै. लो. टिळकांनीं दारुबंदीची चळवळ हातीं घेतली त्यावेळीं पिकेटिंग हा शब्द लोकांच्या परिचयांत आला. हा उपाय मुलामुलींच्या शाळा उदयास आल्या तेव्हां जर लोकांना माहीत असता तर त्यांनीं त्याची कांस धरली असती याबद्दल पाऊणशे ऐंशी वर्षांमागील स्त्रीशिक्षणाचा इतिहास वाचतांना शंका रहात नाहीं.

धर्म बुडेल, चारित्र्य भ्रष्टेल, अशी ओरड चालू असतांहि मुलामुलींच्या शिक्षणाला अडथळा झाला नाहीं. दोन्ही वर्गाच्या शिक्षण संस्थांची लोकाश्रयाखालीं झपाट्यानें संख्यावाढ आजपर्यंत होत राहिली; परंतु या शिक्षणाचा लाभ आरंभीं कित्येक वर्षें फक्त कांहीं ठराविक समाजविभागाला मिळत होता. दुसरे समाज विभाग शिक्षणाविषयीं उत्सुक नव्हते. ब्राह्मण, कायस्थ, सारस्वत, यांचा शाळांतून मोठा भरणा असे. मराठा ( शुद्ध अब्राह्मण, कायस्थ, पाठारे हे अब्राह्मण खरे पण बहुजन समाजांत मोडणारे नव्हत. ) विद्यार्थी वर्ग हाताच्या बोटांनीं मोजतां येण्यासारखा अल्पसंख्य असे व तोहि पुणे-मुंबईसारख्या शहरांतून असे. या वर्गांतील विद्यार्थ्यांना संस्कृत शिकवायचे नाहीं, अशा बाण्याचे त्यावेळीं कित्येक ब्राह्मण शिक्षक होते. अब्राह्मण विद्यार्थी बुद्धिमान असल्यास त्याला लोकांच्या दृष्टीआड संस्कृत शिकविण्याला न कचरणारे ब्राह्मण शिक्षक राजरोसपणें सर्वांदेखत संस्कृत शिकविण्याला आढेवेढे घेत. प्रारंभीं ज्या शाळा होत्या त्या बहुतेक सरकारी व मिशनऱ्यांच्या होत्या. शिक्षण कार्याला सुमारें पन्नास वर्षें लोटल्यावर लोकाश्रित शाळांचा पाया घातला जाऊं लागला. सरकारी व मिशनरी शाळांसमोर लोकाश्रित शाळा फार दिवस टिकणार नाहींत, ही कल्पना अनेक सरकारी व मिशनऱ्यांच्या शाळा नाहींशा झाल्यानें साहजीकच खोटी ठरली आहे. येथें शिक्षणाच्या विषयांत एक गोष्ट सांगणें अवश्य आहे. सामान्य अब्राह्मण व महार चांभारासारखे विशेष अब्राह्मण यांच्या संबंधांत राज्यकर्ते स्पृश्य-अस्पृश्य हा भेद पाळीत होते. कांहीं शाळांतून अस्पृश्यांचीं मुलें आलीं असतां त्यांना स्पृश्य अब्राह्मणांनीं विरोध केला. स्पृश्यांच्या बैठकीबाहेर कांहीं अंतरावर अस्पृश्यांचीं मुलें स्पृश्यांच्या संमतीनें बसवावीं व या व्यवस्थेला स्पृश्यांची मान्यता नसेल तर अस्पृश्यांना शाळेंतच येऊं देऊं नये, ते कांहीं वर्षें अशिक्षित राहिले तरी चालेल, अशा धोरणाचा मजकूर १८५० च्या आगेंमागें सरकारी शिक्षणखात्याच्या अहवालांतून पहायला सांपडतो. सरकारला जें धाडस करवलें नाहीं, तें याच काळांत म. ज्योतिबा फुले यांनीं सफल करून दाखविलें. ब्राह्मणाव्यतिरिक्त वेद तर नाहींच पण काव्य नाटकासारखें साधें संस्कृतदेखील शिकवायचें नाहीं हा ब्राह्मणांचा अभिनिवेश शाळाकॉलेजांतून उरलेला नसला आणि अभ्यासक्रमांतील निवडक वैदिक भाग कोणत्याहि जातीचीं मुलें शिकत असलीं तरी भिक्षुकी करणाऱ्या ब्राह्मणांत त्यांतील वेदापुरता अंश कसा अजून शिल्लक आहे यांचा नुकताच रेडियोच्या कारभारांत अनुभवास आलेला मुंबईतील मासला सांगायला हरकत नाहीं. रेडियोतून सुंदर अर्थाचीं लहान लहान सूक्तें म्हटलीं जावीं, अशा योजनेची प्रस्तावना करण्यासाठीं कित्येक वेदपाठी भिक्षुकांना निमंत्रणें गेलीं. प्रथम ज्यांनीं कबूली दिली होती ते एकदोन दिवसांनीं बारगळले. त्यांची भिक्षुकी बंद पडेल, अशी भीति त्यांना वाटली. रेडियो अठरापगड जाती ऐकणार म्हणजे वैदिक सूक्तें अब्राह्मणांच्या कानीं जाणार अर्थात् धर्मानुसार हें पाप आहे, असें कारण त्यांच्या भीतीमागें असल्याचें त्यांच्याकडून सांगण्यांत आलें. आज जगभर मोठाल्या विद्यापीठांतून प्रत्यक्ष वेदांचा आणि वैदिक वाङ्मयाचा सूक्ष्म अभ्यास चालू आहे. ऋग्वेदाची संहिता मॅक्समुल्लरनें शंभर वर्षांमागें इंग्लंडांत छापून काढली; यासारख्या हकीकतीनें त्या भिक्षुकांची भीति मोडली नाहीं. ज्यांचें वेदाइतकें पावित्र्य समजलें जात होते त्या ग्रंथांचें भाषान्तर व मुद्रण होऊं नये असा आग्रह दादोबा पांडुरंगांच्या आत्मचरित्रांत नमूद केलें आहे.

वृत्तपत्रें किंवा नियतकालिक म्हटलें कीं छापखाने आले व छापखान्यांतून केवळ नियतकालिकेंच बाहेर पडूं लागलीं असे नसून सर्वप्रकारचें वाङ्मय प्रसिद्ध होऊं लागलें. प्रथम कांहीं काळ शिळा छापाची चलती होती, पुढें टाइपांचा सरसकट वापर सुरू झाला. छापखान्यांतून निघणारे धार्मिक ग्रंथ, छापण्याच्या शाईत चरबी असते म्हणून सोवळ्यांत वाचण्याच्या योग्यतेचे नव्हत, अशी कल्पना एकदां प्रबळ होती. धार्मिक पुस्तकांच्या बांधणींत रेशमी वस्त्राचा सोवळ्याच्या मानासाठीं उपयोग केला गेला तरी तें वस्त्र चिकटविण्याच्या पदार्थांत निषिद्ध वस्तु असतात, यासाठीं रेशमी कापडाच्या बांधणीचीं पुस्तकें सोवळ्यांत वर्ज्य होतीं. आपलीं पुस्तकें धर्मनिष्ठांत खपविण्याच्या हेतूनें आपल्या छपाईच्या शाईत चरबी नसल्याची हमी जाहिरातींतून पुकारणारे प्रकाशक, जुनीं वृत्तपत्रें चाळल्यास पाहतां येतील.

या धावत्या विवेचनावरून समाजाच्या आचारविचारांत होऊं घातलेल्या फेरफाराची त्यांच्या प्रतिक्रियेची थोडी कल्पना येऊं शकेल.

## गाथा सप्तशती

हे सुभग, तूं झोंपेचें सोंग घेऊन
डोळे मिटून पडला आहेस;
मला तुझ्या शेजारीं जागा दे
मी तुझ्या गालाचें चुंबन घेतलें
तेव्हां तुझें अंग पुलकित झालेलें मीं पाहिलें.
हें पहा,
मी पुन्हां उशीर करणार नाहीं, वरें का ?



गाथा सप्तशती

आतां एकेक विषय घेऊन अधिक विचार करतांना आधीं चटकन् ज्यावर दृष्टि जाते, त्या पोषाखापासून प्रारंभ करणें उचित वाटतें.

पन्नास वर्षांमागें टोपी, रुमाल, पगडी यांपैकीं एखादें शिरस्त्राण डोक्यावर असल्या-खेरीज रस्त्यावरून फिरणें हें पुरुषांच्या बाव-तींत असभ्यपणाचेंच नव्हे तर अशुभ लक्षण समजलें जात असे. शंभर वर्षांइतकें मागें गेल्यास टोपी व रुमाल यांचा अभाव होता हें लक्षांत येईल. तेव्हां पगड्या नव्हत्या. पागोट्याचा पगडी हा संक्षेप लोकांनीं मानवून घेतला व त्या नंतरचे रुमाल हे एक प्रकारें फेट्याचें प्रतीक असल्यानें त्याबद्दल लोकांनीं नाखुषी दाखविली नाहीं. पगडी व रुमाल जाऊन जेव्हां तरुणांच्या डोक्यावर टोप्या चढलेल्या दिसल्या तेव्हां वृत्तपत्रांतून त्याबद्दल चर्चा होऊं लागली. तरी साफ उघड्या डोक्यापेक्षां टोपीनें झांकलेलें डोकें बरें, असें समाधान लोकांनीं पतकरलें. १९२० सालीं म. गांधीची चळवळ बळावली तेव्हां पांढऱ्या गांधीटोप्यांनीं पहिल्या शिरोभूषणांची हकाल-पट्टी केली. त्या मागून डोक्यावर कांहींच नसणें हा सभ्याचार गणला जाऊं लागला व तो आज चालू आहे. पुण्यांतील पगड्यांच्या अभिमानी देशभक्तांनी सुद्धां गांधीटोपीचा आदर आरंभला. सांप्रत या टोप्या विशेषतः कॉंग्रेसच्या अनुचरांत दृष्टीस पडतात.

गांधीजींच्या चळवळीपूर्वी पेशवाई थाटाच्या अंगरख्याची जागा इंग्रजी पद्धतीच्या कपड्यांनीं बळकावली होती. तथापि धोतर आपल्या ठिकाणीं लोकांच्या सामान्य व्यवहा-रांत आपलें महत्त्व संभाळून राहिलें होतें. म. गांधींच्या चळवळीनें, हळुहळू हलक्या काप-डाच्या सैल विजारींनीं धोतराला खो दिला व खालीं तळाशीं पायांचा ताबा चपलांनीं घेतला. पुढची बाजू मागें उंचीनें वळवलेल्या लाल-भडक जोड्यांची पूर्वी महती होती. आज ज्या प्रमाणें पगडबंद दुर्मिळ झाले आहेत त्याप्रमाणें ते जोडे बनविणारे चर्मकारहि दुर्मिळ झाले आहेत. पूर्वी वहाणा होत्या, त्याचा चपला हा हलका अवतार आहे. येथें डोक्यापासून पायापर्यंत मजल गांठली तरी डोक्याखालचा व कमरेवरचा शरीरभाग कोणत्या रीतीनें सजविला जातो व जात होता हें सांगावयाचें राहून गेलें आहे. सदरा, कुडता व अंगरखा यांच्या जागीं खमीस, (गंजीफ्रॉक) शर्ट, जॅकिट, कोट (लांब किंवा आखूड) हीं वस्त्रें इंग्रजांच्या अनुकरणानें आलीं. पन्नास वर्षांमागं सुखवस्तु घराण्यांचीं माणसें—मग तीं सरकारी, निमसरकारी नोकरींतील असोत किंवा नोकरी बाहेरील असोत—वर वर्णि-लेल्या. इंग्रजी धर्तीच्या पोषाखानें घराबाहेर फिरावयाचें असा शिरस्ता होता. कचेरींत जातांना बूट, पाटलून, पायमोजे हे सामान्यतः असायलाच पाहिजेत. खालच्या श्रेणींतील कारकून, शाळा कॉलेजांतील बहुतेक सर्व विद्यार्थी, बराचसा शिक्षक वर्ग यांनीं पाट-लुणीचें बंधन स्वीकारलें नसल्याचा अनुभव होता. परंतु शर्ट, कोट हीं वस्त्रें त्यांच्याहि अंगावर दिसत. गांधीजींच्या चळवळीचा आश्रय लाभल्यावर शर्ट त्याची कॉलर या ऐवजीं पैलवानी पद्धतीचा गुंडेछाट सदरा आज सरसकट वापरला जात आहे. खेड्यां-तूनहि या पेहरावाची चलती आहे. चालू स्वराज्य कर्त्यांनीं सरकारी समारंभासाठीं जो पेहराव निश्चित केला आहे. तो कित्येकदां स्वतः राज्यकर्तेच वापरीत नसल्याचें दिसून येतें. हल्लीं उपयोगांत येणाऱ्या पोषाखांत

शुभाशुभाचा विधिनिषेध नाहीं. बारसें असो वा बारावें असो, लग्नाची मिरवणूक अथवा पानसुपारी किंवा शवयात्रा असो, मंगल अमंगल अशा दोन्ही तऱ्हेच्या प्रसंगांना उघडे डोकें, मुंडेछाट सदरा, सैल विजार हा थाट चालतो. पोषाखांत जसा मंगल अमंगलाचा धरबंध नाहीं तसाच मंगल अमंगलांतील स्पर्शास्पर्श विचार देखील लोपला आहे. मागले शुभाशुभाचे विधिनिषेध वर्णूं लागल्यास विस्तार होईल परंतु आपल्या पूर्वजांचे आचारविचार इतिहासाच्या दृष्टीनें जिज्ञासूंना माहीत असणें आवश्यक आहे एवढें सुचविणें अयोग्य नाहीं.

पुरुषांच्या पोषाखाची त्रोटक रीतीनें पहाणी केली. स्त्रिया जुन्या रहाणीच्या आणि विचारसरणीच्या रखवालदार समजल्या जात असल्या तरी त्यांच्या वस्त्रालंकारांत पुष्कळ फरक झालेला आहे. अलंकारांची संख्या खुरटली असून पूर्वीच्या जडजड दागिन्यांना फाटा मिळालेला आहे. त्यांतला सकृद्दर्शनीं डोळ्यापुढें येणारा दागिना म्हणजे नथ. तीचा अभाव जुन्या दृष्टीला जाणवणें साहजिकच आहे. घराबाहेर स्त्रियांच्या डोक्यावर पदर असावा, हा शिष्टाचार आतां नथेप्रमाणेंच स्त्रियांनीं सोडला आहे. चाळीस पन्नास वर्षांमागील स्त्रियांच्या वस्त्रालंकारांची ओळख यापुढें रविवर्म्यांच्या चित्रांवरून करून घ्यावी लागेल. पेशवाईतल्या काव्यांतून आलेल्या वस्त्रालंकारांची आज योग्य कल्पना करणें सुद्धां अशक्यप्राय झालें आहे. पेशवाईनंतरच्या काळांत ज्यांचा वापर होता तीं वस्त्रें व भूषणें आज कुठेंच पहायला सांपडत नसल्यानें कोशांतील वस्त्रालंकारवाचक शब्दापुढील ' एक प्रकारचें वस्त्र किंवा भूषण ' या खुलाशावरच समाधान मानण्याची पाळी लवकर यावी असा रंग दिसतो. स्त्रियांची मानेवरील चक्राकार वेणी जाऊन त्यांच्या केशरचनेंत विविध पद्धतींचा प्रसार चालू आहे. नथेचा उल्लेख वर आला आहे. त्या अलंकारासारखीच अवस्था ज्याचा एकदां स्त्रियांच्या व्यवहारांत विलक्षण गौरव होता, त्या कुंकवाची झाली आहे. पुरुषाच्या कपाळीं गंध असण्याला जो अर्थ होता तोच अर्थ स्त्रियासंबंधांत कुंकवाला होता. कुंकवाचें प्रथम प्रमाण संकोचलें, आतां त्याचा लोप घडत चालला आहे. लाल कुंकवाऐवजीं काळ्या रंगाच्या टिंबानें काम भागतें. यांत तारतम्यानें बोलावयाचें तर ब्राह्मणापेक्षां अब्राह्मण समाजांत अद्यापि कुंकवाचें महात्म्य फार मोठ्या प्रमाणांत असल्याचें कबूल करावें लागेल. कुंकवाच्या मागोमाग सौभाग्याचें मंगळसूत्र पूर्वीच्या गौरवस्थानावरून भुईसरपट उतरलें असल्यास नवल वाटायला नको. यामुळें सौभाग्य आणि वैधव्य यांतील भेद मावळून केव्हां केव्हां आलटापालटीनें विचित्र प्रसंग उद्भवतात. वैधव्यसूचक वपन इतिहासजमा होऊन सौभाग्यकाळीं देखील केस कातरून आखूड करण्याची वहिवाट चालू झाली आहे.

स्त्रियांच्या पोषाखांतील दुसरे फरक वर सांगितलेल्या फेरफारासारखेच सहज लक्षांत येणारे आहेत. चोळीमुळें बायकांची पाठ व पोटाचा कांहीं भाग उघडा रहातो म्हणून त्यांनीं जाकिटें वापरावीं, असा उपदेश करणारे आगरकर एकदां जनतेच्या रोषांत होरपळले हा इतिहास सर्वांच्या माहितीचा आहे. परंतु त्यांच्या पश्चात् त्यांचा उपदेश स्त्रियांच्या पेहरावांत सफळ झालेला आज दिसतो. विजारीमुळें जसा पुरुषांचा कासोटा गेला तसा स्त्रियांचाहि गेला. एकदां कासोटा नसणें हे पुरुषासंबंधांत पातक ठरलें होतें. वस्तुतः पेहरावांत नीतिअनीतीचा किंवा पापपुण्याचा विचार करण्याचें कारण नाहीं. कित्येक सनातनी वृत्तीचे हरिदास पुराणिक चालू पोषाखावर अधःपाताच्या ग्रहानें प्रतिकूल टीका करतात; परंतु प्रत्यक्ष व्यवहारावर सदर उपदेशाचा परिणाम होत नाहीं.

पूर्वी लग्नामुंजींचा—विशेषतः लग्नाचा सोहळा कमींतकमी तीन दिवस तरी चालू रहायचा. या सोहळ्यांतील पुष्कळसा तपशील आज छाटला गेला आहे. पायघड्या, रासन्हाणी यांना स्थानच उरलेलें नाहीं. वधूवराकडील भोजन पूर्वीच्या धडाक्यानें होत नाहींत. पाटरांगोळ्या, जेवणाचें सोवळें, कपाळावर रुपेरी सांखळीनें वठविल्या जाणाऱ्या केसरी गंधाच्या लालरेघा, जेवणापुढें ठेवला जाणारा दक्षिणेचा पैसा, यांचा आजच्या लग्नसमारंभांत मागमूसहि सांपडत नाहीं. त्यांतल्या त्यांत पाटरांगोळ्या क्वचित् आढळतात. जेवतांना कसलाहि पेहराव चालतो. मुकटे, कद, धाबळ्या यांचें नांवहि घ्यायला नको. पुष्कळदां भोजन समारंभ एखाद्या हॉटेलांत उरकले जातात व हॉटेलांत बहुधा टेबलावर जेवणें चालतात. यामुळें रांगोळी नसावी हें क्रमप्राप्तच आहे. बायकांना हॉटेलांत कसें जावें हा प्रश्न अडवीत नाहीं. मात्र येथें दक्षिणेच्या पैशाची गतकालीन कामगिरी नमूद न केल्यास कृतघ्नपणाचा दोष लागेल. जेवणाराच्या ताटापुढें दक्षिणा ठेवली रे ठेवली कीं कधीं पैसा फंडाच्या नांवानें तर रायगडावरील शिवाजीमहाराजांच्या समाधीच्या जीर्णोद्धाराच्या नांवानें तो पैसा तत्काळ उचलणारा दक्ष उत्साही प्रौढ बालकांचा वर्ग प्रत्येक भोजनसमारंभांत हजर असे. दक्षिणेच्या पैशाची ही महाराष्ट्र सेवा विसरून चालणार नाहीं. पाटताट, रांगोळी, सोवळें, दक्षिणेचा पैसा या सर्व प्रकाराच्या अस्तामध्यें जर कांहीं पूर्वीच्याच आग्रहानें जीवंत असेल तर तो हुंडा घेण्याचा प्रकार आहे. हल्लीं लग्नाला महिना, दिवस, वगैरे विषयीं अडचण उरलेली नाहीं, वैदिक विधानसुद्धां कालदृष्ट्या संकोच पावलें आहे.

स्त्रीशिक्षण पुरुषांच्या साहचर्यानें व्हावें कां तें स्वतंत्र असावें, हा वाद सांप्रत मागासलेला आहे. स्त्रियांसाठीं एक निराळे विद्यापीठ आहे, माध्यमिक शाळा व महाविद्यालयें आहेत, परंतु मुलांच्या बरोबर शिकणाऱ्या मुलींची महाविद्यालयांतील संख्या पाहिल्यास व पुण्यांत स्त्रियांच्या एका कॉलेजाची झालेली इतिश्री ध्यानीं घेतल्यास सहशिक्षणालाच दुजोरा मिळतो. सहशिक्षणानें स्त्रियांच्या जीवनांत प्रौढविवाह, प्रेमविवाह, विधवाविवाह यांचा प्रादुर्भाव झाला असेल, केव्हां कुठेंतरी घटस्फोटाचे प्रसंग घडत असतील. स्त्रिया नोकरी करूं लागल्यानें कदाचित् बालसंगोपनाकडे थोडें दुर्लक्ष होत असेल, परंतु हे प्रकार भयंकर आपत्तीमध्यें गणले जात नाहींत. पन्नास वर्षांमागें माध्यमिक शिक्षणाच्या काळांतच मुली विवाहाच्या योगानें संसारांत गुंतून पडत असत. महाविद्यालयाच्या पहिल्या एक दोन वर्षांमध्यें तीनचार विद्यार्थिनी दिसायच्या, पण त्या पदवीच्या परीक्षेपर्यंत पोंचूं शकत नव्हत्या. यामुळें पहिल्या पदवीधर स्त्रियांचा वृत्तपत्रांतून बोलबाला गाजला. आतां दरसाल शेकडों विद्यार्थिनी पदव्या पटकावीत आहेत. स्त्रिया नोकरीबाहेर नाटकें चित्रपटांतून कामें करून कीर्ति मिळवीत आहेत. महाराष्ट्रांत स्त्रियामध्यें नाच गाण्याचा शोक गेल्या २५ वर्षांमागें नव्हता. हल्लीं संस्कृति संवर्धनाच्या नांवाखालीं नाचगाण्याचा भाव

अनुक्रमणिका

वाढला असून या कला बाल्यावस्थेंतच स्त्रियांना शिकविल्या जातात व त्याचपुढें त्यांना चित्रपटाच्या व्यवसायांत नेऊन सोडतात. गांधीजींच्या चळवळींत स्त्रियांनीं देशसेवेमध्यें उघड रीतीनें भाग घेऊन ब्रिटिशांच्या दडपशाहीचे आघात सोसले. त्या चळवळीनें सारा समाज अगदीं खालच्या थरापर्यंत ढुसळून काढला. त्या योगानें स्त्रियांमध्यें जागृति वाढून सध्यां देशभर स्त्रियांच्या संस्था अनेक प्रकारचीं कामें करीत आहेत. मंत्री, कलेक्टर अशा लोकनियुक्त किंवा सरकारी नेमणुकीच्या अधिकारावर चढण्याइतकी त्यांची योग्यता वाढली आहे.

पूर्वी हरिदास पुराणिकांचीं कीर्तनें प्रवचनें ऐकून हिंदूच्या प्राचीन स्त्रीपुरुषांचीं व गुणावगुणांची माहिती संपादण्याचा प्रघात होता. त्या मागून शिवाजी, संभाजी या सारख्या ऐतिहासिक व्यक्तींना कीर्तनांत प्रवेश मिळाला. प्रवचनांचे जुने आध्यात्मिक विषय सोडून पुराणिकांनीं सामाजिक समतेसारखे विषय स्वीकारले, हल्लीं किर्तन ही संस्था कशी तरी जगत आहे. पुराणिकांचा मान पूर्वीप्रमाणें उरलेला नाहीं. साक्षर स्त्रिया घरकामांतून फुरसत काढून श्रीधरस्वामीचे हरिविजय, रामविजय पांडवप्रतापादि ग्रंथ वाचीत असत. पुरुषवर्ग ज्ञानेश्वरी, नाथांचें भागवत, भावार्थ रामायण, मोगरीकराचे योगवासिष्ठ, गुरुचरित्र या ग्रंथांच्या परिशीलनानें आपली आध्यात्मिक ज्ञानाची तहान भागवीत. कादंबऱ्या अवतरून त्यांची संख्या झपाट्यानें वाढूं लागल्यावर वरच्या ग्रंथाकडे दृष्टिक्षेप करणें देखील कमी प्रतीचें ही भावना प्रगटली. चातुर्मासांत वाचण्याचे ग्रंथ अशा अर्थाची जाहिरात बहुधा दरसाल आषाढ महिन्याच्या सुमारास कित्येक प्रकाशकातर्फें वृत्तपत्रांतून झळकते. तथापि प्रकाशकांच्या हेतूस अनुसरून ती जाहिरात सार्थ ठरते अशी समजूत धोक्याची आहे. वरच्यासारख्या ज्या ग्रंथांच्या अनेक प्रकाशकांनीं पुष्कळ आवृत्त्या काढाव्या असा पन्नास वर्षांमागें महिमा होता, त्यांतले बरेच ग्रंथ आज बाजारांत नाहींत. ज्ञानेश्वरी, दासबोध, गुरुचरित्र असे दोन तीन ग्रंथ अद्यापि लोकांच्या पारायणांतून आहेत. परामर्थ या शब्दानें ओळखल्या जाणाऱ्या विषयाची आवड लोकांत आहे व त्यासाठीं हे ग्रंथ भाविकांच्या नजरेखालून जात असतात. जे कोणी या वाङ्मयाचा आदर करतात त्यांची वयोमानाकडे पाहून वर्गवारी केल्यास मोठी संख्या मध्यम वयाच्या ( तिशी पस्तिशी उलटलेल्या ) माणसांची सांपडेल. गृहप्रपंचांतील दुःखें भोगण्याची पाळी आली कीं जशी वडिलांच्या पश्चात् खुंटीवर टांगून ठेवलेल्या देवांची आठवण होते व त्याच ग्रंथांचें पारायणाच्या रूपानें भाग्य उघडतें. त्या ग्रंथांतील शिकवणीप्रमाणें वागणूक असा त्यांच्या पारायणाचा परिणाम दिसत नाहीं. नियंत्रित पारायण हेंच पुण्य अशी पारायणामागें भावना असते. या आंधळ्या श्रद्धेला हल्लीं ठिकठिकाणीं उदयास आलेल्या बुवांच्या सेवेचा मार्ग लाभला असून तिकडे हजारोंच्या संख्येनें शिक्षित समाज वळलेला पहावला सांपडतो. पन्नास वर्षांमागें हल्लीं इतके बुवा नव्हते. सानान्द मल्लीला—मग त्याची योग्यता भाविकांच्या मतें कितीहि मोठी असो—' भगवान् ' या शब्दानें वाखाणण्या-

इतकी श्रद्धेची मजल सांप्रत गेलेली आहे. एकीकडे अशी श्रद्धा तर दुसरीकडे 'रामाचें सीतेशीं नातें कोणतें' हा प्रश्न विचारण्याइतकें उच्च शिक्षण घेणारांचें अज्ञान हे दोन्ही प्रकार समाजाच्या स्थितीविषयीं विचार करणारांना गोंधळांत टाकणारे आहेत.

खाणें पिणें विचारांत घेतल्यास ब्राह्मणां-मध्येंसुद्धां खाद्यपेया संबंधांत विधिनिषेधाची कटकट उरलेली नाहीं. फळें खाण्याची प्रवृत्ति वाढली आहे. फळांतील जीवन-सत्त्वाच्या माहितीनें फळांचें सेवन देह-पोषणाला उपकारक समजण्यांत येऊं लागलें. टेबलावर ताटें ठेवून कांट्याचमच्यांनीं जेवण्याचा रिवाज ज्यांना शक्य असेल त्यांनीं स्वीकारला आहे. कांहीं खाद्यांचा निषेध १९१४ व १९३९ मध्यें सुरू झालेल्या दोन जागतिक युद्धांनीं घाल-विला. या विधानाचा उहापोह येथें लांबेल म्हणून तो वाचकांवरच सोपविणें बरें. पूर्वी सणावारामध्यें किंवा पाहुणचारानिमित्त गव्हाचा उपयोग केला जात असे. एरवी जोंधळा बाजरी हीं धान्यें खपत असत. आतां शहरांतूनच नव्हे तर खेड्यांतूनहि मध्यम वर्गाचीं माणसें गव्हाचा आदर करतात. पहिल्या महायुद्धानंतर गव्हाचें प्रेम लोकांत वाढत गेलें.

महाराष्ट्रांत होत असलेल्या सामाजिक आचारविचारांतील क्रांतीचा हा बोटक आढावा सादर केला आहे. बोटक या शब्दानें त्यांतील उणीवांचा बोध होईल. शिवाय हा आढावा हिंदुपांढरपेशा, त्यांतल्या त्यांत ब्राह्मण–वर्गाला समोर ठेवून लिहिलेला आहे. संक्रमणाच्या लाटेंतून समाजाचे इतर वर्ग सुटलेले नाहींत. या संक्रमणाचीं कांहीं कारणें लेखाच्या आरंभीं दाखल केलेलीं आहेत. परंतु त्यांखेरीज दळणवळणाची आगगाड्या आगबोटी सारखीं साधनें, खेड्याच्या वस्तीला शहरांत ओढून आणणारे कारखाने, खाणा-वळी, दुष्काळ, प्लेग इन्फुएन्झासारख्या रोगांच्या साथी, वाढती महागाई, शहरांतून भोंवणारी रहाण्याच्या जागेची विलक्षण टंचाई अशीं आणखी वरींच कारणें आहेत. आग-गाड्या आगबोटींनीं स्पृश्य अस्पृश्य या भेदांची धार नाहींशी केली. खाणवळींतून सोवळे ओवळे, ब्राह्मण अब्राह्मण हे भेद एकदां पाळले जात होते; हल्लीं हे भेद तेथून हाकलले गेले आहेत. प्लेगाच्या साथींची संक्रांत तरुणावर कोसळल्यानें अल्पवयस्क विधवां-संबंधांत पुनर्विवाहाचा उपाय अवलंबावा, असें सनातनी वृत्तीच्या लोकांना वाटूं लागलें. शिकलेल्या वधूशीं लग्न करावें, ही वरांची इच्छा मुलींच्या शिक्षणाविरुद्ध असणाऱ्या आक्षेपाला मारक ठरली व शिक्षणासाठीं मुलींच्या लग्नाची वयोमर्यादा वाढली. नवरा-बायको या दोघांनीं नोकरी करण्याची आव-श्यकता महागाईमुळें निर्माण झाली हें सांगा-यला नको. कुटुंबनियोजन, संततिनियमन इत्यादि योजनांचें मूळ महागाईच आहे. रहात्या जागेच्या टंचाईपायीं तरुण तरुणींचीं लग्नें लांबणीवर पडतात हा प्रकार सर्वांच्या परिचयाचा आहे.

होत असलेली क्रांति हें केवळ पूर्वोक्त बाह्य कारणांचें फळ नसून सुधारक वर्गानें या क्रान्तीला विचारांचें अधिष्ठान पुरविलें, हें ध्यानांत ठेवणें अवश्य आहे. लोकहितवादी, रानडे, भांडारकर, आगरक विष्णुशास्त्री, पंडित, दयानंद, ज्योतीबा फुले, महर्षि कर्वे, बडोद्याचे महाराज सयाजीराव गायकवाड, कोल्हापूरचे शाहूछत्रपति, नुकतेच दिवंगत झालेले भाऊराव पाटील, इत्यादि थोर व्यक्तींचें पुण्यस्मरण केल्याखेरीज या विषयाची पूर्तता होणार नाहीं. गेल्या शतकांत क्रान्तींचीं जीं बीजें पेरलीं जात होतीं त्या सर्वांना प्रचंड उठावाच्या मेहनत मशागतीनें म. गांधींनीं मोठ्या प्रमाणांत विकसित केलें हें न सांगतांहि समजण्यासारखें स्पष्ट आहे.

• • •





**१२५ वर्षापूर्वीची मुंबई**

## शहर साफ ठेवण्याकरितां मंडळीची नेमणूक

'रस्ते वगैरे साफ ठेवविण्याकरितां सरकारांतून एक मंडळी नेमली आहे तींत कलेक्टरसाहेब, अव्वल व दुय्यम कोतवाल, जे. लिट्ल्, फरामजी कावसजी, जमशेटजी जीजीभाई आणि जगन्नाथजी शंकरशेट, यांस नेमले असत. या मंडळीनें रस्त्यांतील व गल्ल्यांतली घाण व अडचणी काढून टाकवाव्या व त्यांस साफ व चांगले नीट ठेववावें; या विषयीं व जेणेकरून या बेटाची हवा लोकांचे शरीरास मानवेल व लोकांस सोयवार पडेल याविषयीं कांहीं सूचना, अथवा जें कांहीं त्यांस सांगावयाचें असेल तें या मंडळीनें सरकारास सांगावें म्हणून सरकारनें फरमाविलें आहे. या मंडळींतील गृहस्थांनीं या कामाकरितां जी योजना केली आहे यावरून, व सरकारांत जी सूचना ते पाठविणार आहेत त्यांचे अभिप्रायावरून, आम्हास असें वाटतें कीं, किल्ल्यांत कित्येक जागीं अशा अडचणी आहेत त्यामुळें जें दुःख भोगावें लागतें तें आतां दूर होईल आणि या मंडळीचे परिश्रमेंकरून येथील सर्व लोकांचें बहुत प्रकाराचें हीत होईल.'

"दर्पण"—२७ जून १८३४



अनुक्रमणिका

स्वतःचं रूप, शब्द–स्वर, सारं सारं तिला परकी झालं. भिजलेली माती पाहून ती सळसळूं लागली—कांहीं तरी नवीन—धुंद असं विश्व सुनंदाच्या भोंवती निर्माण झालं—



# भेट

— विजया राजाध्यक्ष

पावसाचे दिवस आहेत. मधूनमधून सरी येतात. माती भिजते. हें भिजणें तिला हवें आहे; ओथंबलेलें आभाळ तिला हवें आहे; अबोल वाट पाहणें तिला हवें आहे....

...नुकतीच एक जोराची सर येऊन गेली आहे; आणि आतां कोवळें ऊन पडलें आहे. या उन्हाला एक फिका गंध आहे. त्यानें प्रत्येकालाच हळवें केलें आहे....

" तूं बाहेर येणार ? " सुनंदाची बहीण तिला विचारते.

" नको ग... "

" कां ?"

...या प्रश्नाला उत्तर नाहीं. किती तरी प्रश्नांना उत्तरें नसतात. अलीकडे सुनंदा स्वतःतच रुतल्यासारखी भासते ? एकटी कां बसते ? बोलत कां नाहीं ? बाहेर कां पडत नाहीं ?

...सुनंदा स्वतःतच रुतली आहे—आणि तरीहि रिती झाली आहे. स्वतःचा शब्द तिला ओळखत नाहीं; स्वतःचा स्वर तिला ओळखत नाहीं; स्वतःचें रूप तिला ओळखत नाहीं. भिजलेली माती पाहून ती सळसळते; पण कां, तें तिला कळत नाहीं. संध्याकाळच्या वेळीं ती कशांत तरी बुडून जाते—आणि कांहीं वेळानें पुन्हा कोरडी होते; त्या कोरडेपणांत रुतून बसते....

...तीन दिवस हेंच चाललें आहे...मावशीकडून परत आल्यापासून...नवें, धुंद असें कांहींतरी घेऊन परत आल्यापासून....

" आमची सुनंदा आतां मोठी दिसायला लागली..."

" रूपानं गोड आहे, स्वभावानं लाघवी आहे...पहा एखादा चांगला मुलगा तुमच्या माहितींत असला तर..."

...या शब्दांनीं सुनंदा फुलली होती; लाजली होती; स्वप्नांनीं मुसमुसली होती ..आपल्याकडे कोणीतरी रोखलेल्या डोळ्यांनीं पाहणार...आपल्याशीं कोणीतरी दबलेल्या स्वरांत बोलणार... आपल्याला कोणी तरी स्पर्श करणार...त्या स्पर्शाशिवायच ती थरारली होती ..

" खरं सांग सुनंदा. तुझं अजून कोणाशी जमलेलं नाहीं ? " एक प्रेमांत पडलेली मैत्रीण तिला सतत छेडत होती.

" तुझी शपथ नाहीं ग..."

" तुझ्यासारखी गोड मुलगी कोणाच्या तरी नजरेंतून सुटणं शक्य आहे कां ? "

अनुक्रमणिका

" खरंच, कोणाची नजर आपल्यावर खिळली असेल ? "

" अग, तुला माहीत नसेल, पण कित्येकजण मनांतल्या मनांत तुझ्यावर प्रेम करत असतील. खरं सांग, कॉलेजांत कांहीं तरी निमित्त काढून तुला कोणी अडवलं नाहीं ? तूं फिरायला जातांना कोणी दारांत येऊन उभं राहात नाहीं ? "

खरंच, कोणी उभें राहात असेल का ?

" माझाच अनुभव सांगते तुला. त्यांनी म्हणे मी केव्हां, कोणत्या रस्त्यानं फिरायला जाते, हें हेरून ठेवलं होतं. हळूहळू ओळख वाढली. आणि एक दिवस... "

हा एक दिवस आपल्यालाहि अनुभवाला येईल का ?

...चंद्राशिवाय चांदणें पडलें...आणि ती त्यांत बुडूं लागली... कोणी तरी आपल्याकडे रोखलेल्या डोळ्यांनी पाहाणार...कोणीतरी आपल्याला स्पर्श करणार...

...एक दिवस हा कोणी तरी तिच्या स्वप्नांत आला. त्याचे केस उनाड होते; त्याचे डोळे, दुसऱ्या कोणाच्या डोळ्यांना तेथें न पोचूं देणारे होते; त्याची चाल अहंकारी होती...

"...खरं सांग सुनंदा, तुझं अजून कोणाशीं जमलेलं नाहीं ? "
" कोणाला सांगणार नाहींस ? "
" खरंच नाहीं..."
" आमच्या कॉलेजांत एम्. ए. ला एकजण आहे..."
" आडनांव काय ? "
" वैद्य..."

...आणि मग फक्त तोच...रात्री त्याचीच स्वप्नें...आणि दिवसा त्याच्या स्वप्नांची रेंगाळणारी नशा...त्या नशेंत मैत्रिणीला त्याच्याविषयीं लाजत लाजत सांगितलेलें कांहीं...जें कधीं घडलें नाहीं... पण वाटें, घडलें...तो आपल्याशीं हलक्या स्वरांत बोलला...त्यानें आपल्याला स्पर्श केला...तो आपली वाट पाहातो आहे...हें दूर राहणें त्याला असह्य झालें आहे...तो या गांवांत धांवत येणार आहे...आणि आपल्यासमोर उभा राहणार आहे...आपल्या अंगाला कंप सुटणार आहे...मग त्याचीच प्रतीक्षा—आणि त्याच्या पत्रांची. या प्रतीक्षेंतच दिवस चालले आहेत. तो येत नाहीं, त्याचं पत्रहि येत नाहीं, म्हणून मन कोमेजतें आहे—आणि घरीं परतल्यावर तो भेटणार या आशेनें तें तरारतें आहे...

...मनाला कोवळी, पोपटी रंगाचीं पानें फुटलीं आहेत आणि सुनंदा अबोल झाली आहे. कांहीं करूं नये, कोणाशीं बोलूं नये, कोठें जाऊं नये...

... फक्त त्या उनाड केसांची वाट पाहावी...

" अरे, तुम्ही आलात गांवाहून ? "
" किती दिवस राहायचं ? "
" माझी आठवण झाली ? "
—या शब्दांची वाट पाहावी...

... तीन दिवस हेंच चाललं आहे. परवां तो आला नाहीं, काल आला नाहीं...आज तरी येईल का ?

सुनंदा एकटीच घरीं आहे. पुन्हापुन्हा रस्त्याकडे डोळे लावते आहे. काल पाऊस होता, म्हणून आला नसेल—आतां ऊन आहे... सहा वाजले. तो निघण्याच्या तयारींत असेल. मुद्दामच उशीर करत असेल...सहा वाजेपर्यंत घरीं कोणी ना कोणी असते. त्या गर्दींत दुरावा कसा संपणार ? एकांत पाहिजे. शब्द फक्त सुन्या घरानें ऐकले पाहिजेत...साडेसहा वाजले...निव्रतांनिव्रतां कोणीतरी मित्र आला असेल...सात वाजले...साडेसात वाजले...

तो आला नाहीं...तो आला नाहीं...

आतां हा एकांत नकोसा वाटतो आहे...

—अंधार पडला आहे...त्या काळोखांत स्वतःला बुडवून घेण्यासाठीं ती बाहेर पडते...चालत राहते...दिशा कोणती आहे ? .. रस्ता कोणता आहे ?...

—आणि अनपेक्षितपणें तो दिसतो—मित्रांच्या घोळक्यांत... घोळका जवळ येतो. तो तिच्याकडे पाहतो—

—फक्त पाहतो...

...मनाचा पोपटी रंग पुसून गेला आहे...

• • •

---

( पान ४२ वरून चालू )

पासून संरक्षण झाल्याचा आनंद जास्त होतो कीं नाहीं तें मला माहीत नाहीं. पण आम्हीं मात्र चाकरीच्या पिंजऱ्यांत राहून सुरक्षितेचा आनंद लुटीत असतों. सापळ्याचा अर्थ उंदराला माहीत आहे; पण आम्हाला तो माहीत असूनही त्यापासून आम्ही दूर राहूं शकत नाहीं, हें जाणवतं म्हणूनच कदाचित् उंदरांचा उपद्रव होत असतांनाही मी त्यांचं मरण चार आठ दिवस पुढं ढकलून त्यांच्याबद्दल सहानुभूति व्यक्त करतों.

आणि मी जेव्हां मनांत डोकावून पाहतों तेव्हां मला धक्काच बसतो. कारण तिथंही एक उंदीर मला दिसतो. भित्रा, स्वतःच्या जिवाला जपणारा, संकट दिसल्याबरोबर पळूं पाहणारा, अस्थिर...मी घरांतले अनेक उंदीर मारले, हुसकले पण हा उंदीर मी हुसकूं शकत नाहीं—घालवूं शकत नाहीं आणि अपरिहार्यतेनं मला मनूचा ( म्हणजे आमचा माने-स्मृतिवाला नव्हे ) आधार घ्यावा लागतो आणि म्हणावें लागतें—

फक्त मी उंदीर आहे
फक्त मी उंदीर आहे ॥

• • •








[ संयुक्त महाराष्ट्राची कांहींच गडबड नव्हती तेव्हां हा लेख १९५१ सालीं ' नवयुग 'च्या दिवाळी अंकांत श्री. अनंत काणेकर यांनीं लिहिला होता. यांतला मध्यवर्ति विचार, आणि युगोस्लाव्हियाचे एकेकाळचे उपराष्ट्रपति श्री. मिलोव्हन् जिलास् यांनीं १९५७ सालीं लिहिलेल्या व सर्व जगांत खळबळ उडवून देणाऱ्या ' दि न्यू क्लास ' या अंकांतल्या, इथें उधृत केलेल्या उताऱ्यांतला विचार यांतलें विलक्षण साम्य पाहून वाचकांना कौतुक वाटेल यांत शंका नाहीं.— संपादक ]



# राष्ट्रगाणें - प्रदेशी भिकेचा

— अनंत काणेकर

" The future world will probably be more varied, and as such more unified. Its imminent unification will be made possibly by variety, not by sameness of type and personality–sameness of type and personality would mean slavery and stagration not a higher degree of freedom for production than todays. "—Milovan Djilas in ' The New Class. '

या लेखांत संयुक्त महाराष्ट्र, महागुजरात, संयुक्त कर्नाटक वगैरें भाषिक राष्ट्रें व्हावीं,— केवळ भाषिक प्रांत होऊन भागणार नाहीं, असें मी म्हणणार आहे आणि त्याबरोबरच यापुढें आतां स्वतंत्र भारत, सार्वभौम इंग्लंड, स्वतंत्र अमेरिका अशीं स्वतंत्र राष्ट्रें जगांत रहाण्यांत कांहीं अर्थ नाहीं.—त्यामुळें जगाला फार मोठा धोका आहे; जगाचें एक मध्यवर्ति राज्य व्हावयाला हवें, असेंही सांगणार आहे. हीं दोन विधानें वाचून आगींत पाणी किंवा पाण्यांत आग हीं दोन्ही एकत्र रहायला हवींत असें कांहीं तरी मी बडबडतों आहे असें पुष्कळांना वाटण्याचा संभव आहे. पण शांतपणें विचार केल्यास या दोन गोष्टींतच जगाचें हित आहे हें कुणाच्याही ध्यानांत येईल.

जगांत जीं दोन भयानक महायुद्धें गेल्या पंचवीस तीस वर्षांत झालीं आणि तिसऱ्या सर्वविध्वंसक युद्धाच्या ज्या छाया आज जगावर वावरत आहेत त्यांच्यावरून विचारवंतांची खात्री पटून गेली आहे कीं इतर बारीकसारीक कारणें कांहीं असोत या पुन्हां पुन्हां उद्भवणाऱ्या महायुद्धांचें प्रमुख कारण गेल्या शेंदीडशें वर्षांत विज्ञानांच्या विकासामुळें सर्व जग एक झालें आहे, पण राष्ट्रीय सार्वभौमत्वाचें आतां जुनाट झालेलें तत्त्व जगाचा एकच व्यवहार होऊं देत नाहीं. जगाच्या एका टोकाहून दुसऱ्या टोकाला आतां चोवीस तासांत पोहोंचतां येतें. पण एकाद्या राष्ट्राच्या मनांत आलें तर आपल्या भूप्रदेशावरल्या आकाशांतून दुसऱ्या राष्ट्राच्या विमानाला तें जाऊं देत नाहीं. अमेरिकेकडे ठेवायला जागा नाहीं म्हणून किंवा योग्य किंमत देणारे गिऱ्हाईक नाहीं म्हणून जाळून टाकण्याइतका गहूं आहे. पण दुष्काळ पडून कोट्यवधि माणसें तडफडून मरण्याची पाळी आलेल्या भारताला अमेरिकन राष्ट्राची खुशी असली तर तें राष्ट्र गहूं देणार किंवा अमेरिकेनें भारताला पेट्रोल द्यावयाचें नाहीं असें ठरविलें तर आमच्या मोटारी, विमानें, सैन्याचे रणगाडे थंड पडणार. विज्ञानपूर्व काळांतल्याप्रमाणें जगांतले लोक आतां एकमेकांपासून दूर पडलेले नाहींत. पूर्वी काशींतला माणूस पुण्यांतल्या माणसाला आयुष्यांत एकदां केव्हां तरी भेटण्याची महत्त्वाकांक्षा धरी; आतां मुंबई–पुण्यांतला माणूस न्यूयॉर्कमधल्या माणसाला आठवड्यांत दोनदां भेटूं शकेल. एक पेला आपण चहा घेत असतां आपला सर्व जगाशीं संबंध येतो. कपबशा असतात झेकोस्लोव्हाकियांतल्या, चहा असतो चीनमधला. साखर असते जावा किंवा क्यूबांतली, आणि पाणी काय तें आपल्या गांवांतलें असतें. आणखी अनेक उदाहरणें देतां येतील. जगांतले लोक आतां इतके परस्परावलंबी झाले आहेत कीं त्या सर्वांनीं मिळून आपली कांहीं व्यवस्था केली नाहीं, तर त्यांना स्वतःची प्रगती करणेंच काय पण जिवंत राहणेंही शक्य नाहीं. म्हणजेच आतां खुळचट ठरलेल्या राष्ट्रीयत्वाचा त्याग करून त्यांनीं एक मध्यवर्ति जागतिक राज्य प्रस्थापित करायला पाहिजे. आज









अनुक्रमणिका

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अशी कांहीं व्यवस्था नसल्यामुळें राजीखुषीनें आपणाला आवश्यक असलेलें एका राष्ट्राला दुसऱ्या राष्ट्राकडून मिळालें नाहीं कीं युद्धप्रसंग उद्भवतो. या विषयावर अत्यंत विचारपूर्ण असा ग्रंथ लिहिणाऱ्या एमेरी रीव्हज्नें दाखवून दिलें आहे कीं अमक्या देशांत समाजवाद आहे आणि तमक्या देशांत भांडवलशाही आहे म्हणून समाजवादी देश युद्ध करणार नाहीं आणि भांडवलशाही देश युद्ध करील याही बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. राष्ट्रीयत्वाच्या चौकटींत समाजवाद असला काय, भांडवलशाही असली काय आणि फाशीवाद असला काय, दोन राष्ट्रीयत्वांची टक्कर ही होणारच आणि तिच्यांतून महायुद्ध उद्भवणारच. जगांतल्या जनतेचे सर्व संबंध आंतरराष्ट्रीय किंवा अतिराष्ट्रीय झाले आहेत. त्यांच्यांत अडथळे निर्माण करणाऱ्या राष्ट्रीयत्वाच्या या जुनाट भिंती पाडून जमीनदोस्त केल्याशिवाय युद्धें थांबणार नाहींत, जगाला शांतपणें जगतां येणार नाहीं, असें रीव्हज्चें म्हणणें आहे आणि तें कुणालाही पटण्यासारखें आहे.

राष्ट्रीयत्वाच्या या भिंती पाडून टाकल्या कीं लहान मोठीं स्वतंत्र सार्वभौम राष्ट्रें नष्ट होऊन जग हेंच एक राष्ट्र होईल आणि त्या राष्ट्रांचा कारभार मध्यवर्ति जागतिक राज्य चालवील. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे राष्ट्र या शब्दाला कांहीं अर्थच उरणार नाहीं आणि एक असलेल्या जगाचें एकच राज्य होईल. या जागतिक राज्याची व्यवस्था कशी असेल, त्यांना घटक काय असतील, अतिरिक्त केंद्रीकरण म्हणजे लोकशाहीचा अस्त—तेव्हां एकच जागतिक राज्य म्हणजे केंद्रीकरणाचा कळस नाहीं का होणार, इत्यादि प्रश्नांचा आतां विचार केला पाहिजे. केंद्रीकृत सत्ता असली कीं घटकांना आपलें वैशिष्ट्य राखतां येणार नाहीं, सगळ्या जगाचा एक टोकळा करण्याकडे प्रवृत्ति होईल हें अगदीं खरें आहे. राजकीयदृष्ट्या जगाचें एक राज्य झालें तरी जगाची खरी प्रगति व्हायची असेल,—विद्या, कला, संस्कृति, साहित्य यांचा विकास व्हायचा असेल तर प्रत्येक घटकाला आपलें वैशिष्ट्य टिकवण्याचें आणि वाढण्याचें ज्यास्तींतजास्त स्वातंत्र्य पाहिजे. प्रगति म्हणजे प्रत्येक सूक्ष्म वैशिष्ट्याचा विकास, म्हणजेच विविधतेचा विकास. सर्वांचाच एक सांचा किंवा टोकळा करणें म्हणजे परागति. आदर्श जगांत जर्मनांचें कांहीं विलोभनीय वैशिष्ट्य असेल. जपान्यांचें कांहीं असेल, मराठ्यांचें कांहीं असेल बंगाल्यांचें कांहीं असेल, गुजरात्यांचें कांहीं असेल तर त्या सर्वांना संपूर्ण वाव मिळाला पाहिजे. तेव्हां एका टोकाला राष्ट्रीयत्वाची ही कल्पना झुगारून देऊन जगांचें एकराज्य करायचें, तर दुसऱ्या टोंकाला प्रत्येक घटकाला ज्यास्तींत ज्यास्त स्वातंत्र्य द्यायचें असा हा समतोल सांभाळला गेला पाहिजे. म्हणूनच जगाचें एक राज्य म्हणजे न्यूयॉर्क, लंडन किंवा कैरो, दिल्ली, जागतिक राज्याची जी कोणती सोयीस्कर राजधानी ठरले तिथें एक सरकार बसणार आहे आणि मुंबईत गटारें तुंबलीं किंवा शिकागोंत दरोडे पडले तर तीं गटारें साफ करण्याची किंवा त्या दरोडेखोरांना पकडण्याची सर्व जबाबदारी तें सरकार घेणार आहे, ही कल्पना चुकीची आहे. आज ज्याप्रमाणें शहराचा कारभार नगरपालिका पहातात, प्रांतांचा प्रांतिक सरकारें पहातात, देशांचा राष्ट्रीय सरकारें पहातात. त्याप्रमाणेंच जे जागतिक प्रश्न आहेत तेवढ्यांचाच जागतिक सरकार विचार करील. फरक फक्त दोनच बाबतींत पडेल. आजच्या यूनोप्रमाणें चर्चा करायची, निर्णय घ्यायचे पण ते अमलांत आणायची सार्वभौम सत्ता मात्र हातीं नाहीं, असें तें जागतिक राज्य असूं शकणार नाहीं. राष्ट्रीय सार्वभौमत्व नष्ट झाल्यामुळें सार्वभौम सत्ता या जागतिक सरकारच्याच हातीं असेल. माझ्या मतें दुसरा महत्त्वाचा फरक पडायला हवा तो असा कीं जागतिक सरकार झालें तरी सोयीच्या दृष्टीनें शहरांसाठीं नगरपालिका, प्रांतांसाठीं प्रांतिक राज्यें आणि देशांसाठीं सार्वभौम सत्ता नसलेलीं पण कामचलाऊ अशीं राष्ट्रीय सरकारें रहातील हें खरें, पण ज्या राष्ट्रांत अनेक भाषिक लोक आहेत त्या राष्ट्रांतल्या त्या त्या भाषिक गटचें स्वतंत्र राष्ट्र जाहीर करून त्याला या जागतिक राज्याचा घटक बनवून टाकावें. रशिया किंवा हिंदुस्थान यासारख्या दोन तीन राष्ट्रांपुरतांच हा प्रश्न आहे तेव्हां त्यांत कांहीं फार कठीण आहे असें नाहीं. आज बावन्न राष्ट्रें यूनोचीं सभासद आहेत. त्यांत फार तर पंधरा सोळा हिंदुस्थानांतल्या राष्ट्रांची आणि दहा-बारा रशियांतल्या राष्ट्रांची भर पडेल आणि जागतिक संघराज्याच्या घटक सभासदांची संख्या फार फार तर शंभरपर्यंत जाईल. पण हेंच करणें स्वाभाविक आणि सर्व घटकांच्या विकासांच्या दृष्टीनें योग्य होईल असें मला वाटतें. इंग्लंड, जर्मनी, जपान वगैरे या जागतिक संघराज्याचे सभासद असतील, त्याप्रमाणेंच महाराष्ट्र, गुजरात, आंध्र, तामीळनाड, बंगाल वगैरे आणि उझबेकिस्तान, ताजिकिस्तान वगैरेही असतील. आजसुद्धां रशियांतील यूक्रेन आणि बायलोरशिया यांना यूनोचें स्वतंत्र सभासदत्व आहेच. महाराष्ट्र, गुजरात, बंगाल, वगैरे स्वतंत्र राष्ट्रें व्हावीं, असें मी म्हणतों यांत भयंकर कांहीं नाहीं हें आतां कुणाच्याही ध्यानांत येईल. कारण राष्ट्र या शब्दाचा मूळ

---

## गाथा सप्तशती

रडणें शक्य होतें, तोंवर ती रडली
शरीराला शक्य होतें, तेवढें झिजली
श्वासोच्छ्वास चालू आहे
तोंवर बिचारी निःश्वास टाकीत आहे !



बाता सप्तशती : १९५९

अर्थच बदललेला असेल. राष्ट्र म्हणजे प्रांत नव्हे, जागतिक संघराज्याचा स्वायत्त घटक इतकेंच. हें संघराज्य जागतिक प्रश्नांचाच विचार करील असें वर म्हटलें त्याचा थोडा विस्तार केला पाहिजे. आपल्या भारताच्या संघराज्यांत काश्मीरसारखें संस्थान ज्याप्रमाणें फक्त तीन बाबीपुरतें सामील करून घेण्यांत आलें आहे, बाकी सर्व बाबींत त्याला स्वातंत्र्य किंवा स्वायत्तता आहे, तसाच थोडासा प्रकार जागतिक संघराज्य आणि त्याचें घटक यांच्या संबंधांत असेल. संरक्षण दळणवळण, आणि परराष्ट्र संबंध एवढ्यापुरतीच भारतीय संघराज्याची काश्मीरवर सत्ता आहे. जागतिक संघराज्यांत परराष्ट्रसंबंधांचा प्रश्नच उद्भवत नाहीं; कारण जगच एक राष्ट्र होतें, पर राष्ट्र उतरत नाहीं. युद्धें करण्यासाठींही सैन्य ठेवण्याची आवश्यकता नाहीं. परराष्ट्रखातें आणि गृहखातें हीं एकच होणार. अंतर्गत बंडाळी किंवा उठाव यांच्या बंदोबस्तासाठीं एक आंतरराष्ट्रीय सैन्य किंवा आंतरराष्ट्रीय सशस्त्र पोलीस ठेवावे लागतील. मुख्यत्वेंकरून जागतिक देवाणघेवाण आणि जगांचे आर्थिक किंवा सामाजिक प्रश्न यांच्याकडेच जागतिक सरकारला लक्ष द्यावें लागेल.

या विवेचनावरून हें ध्यानांत येईल कीं शक्य तितके विकेंद्रीकृत असें स्वतंत्र किंवा स्वायत्त घटक असावेत आणि भाषा हा प्रत्येक घटकाचा पाया असावा. या दोन गोष्टींवर माझा विशेष रोख आहे. लोकशाहीचा आणि विविधतेचा विकास या दृष्टीनें शक्य तितकें विकेंद्रीकरण आणि प्रत्येक घटकाला स्वायत्तता पाहिजे हें आपण पाहिलेंच. यावर कोणी विचारील कीं जास्तींत जास्त लोकशाही किंवा विविधता यांच्यासाठीं भाषिक गटापेक्षांहीं लहान गट कां करूं नये ? प्रत्येक माणूस वेगळा असतो. तेव्हां जास्तींत जास्त विकेंद्रीकरण म्हणजे प्रत्येक माणूस स्वतंत्र स्वायत्त होऊं शकेल, हें खरें आहे; पण या बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. माणूस हा समाज करून रहाणारा प्राणी आहे, माणूस म्हणून जागण्याकरतां आणि स्वतःचा विकास करून घेण्याकरतां त्याला इतरांशीं हरतऱ्हेचे सामाजिक, राजकीय, आर्थिक संबंध निर्माण करावे लागतात आणि तो जो समाज निर्माण करतो त्या समाजाचे बरेचसे व्यवहार भाषेनेंच चालतात, किंबहुना भाषा नसेल तर माणसाला समाज करून रहातां येईल कीं नाहीं याचीच शंका आहे. याच गरजेतून प्रत्येक भाषा निर्माण झाली आहे. जगांत जे भाषिक गट आहेत त्यांच्यापैकीं प्रत्येकाचें बरेंचसें वैशिष्ट्य त्यांच्या भाषेंतून व्यक्त झालेलें आहे आणि त्यांचा बहुतेक सर्व व्यवहार भाषेनेंच चालतो; म्हणून जागतिक राज्याचा लहानांत लहान घटक हा भाषिक गटच असावा, असें मी म्हणतों.

अशा स्वायत्त घटकांचें जागतिक संघराज्य करायचें एकदां ठरल्यावर मग मध्येंच आणखी भारत किंवा रशियासारख्या अनेक भाषिक अशा फक्त एक दोन राष्ट्रांच्या पोटांतल्या,—यूरोपमधल्या नॉर्वे–स्वीडन-सारख्या किंवा मध्यपूर्वेंतल्या एक एका राष्ट्रापेक्षांही मोठ्या असलेल्या महाराष्ट्र, बंगाल, गुजरात किंवा ताजिक, अझरबैजान, उझबेक या भाषिक गटांना विनाकारण दुय्यम स्थान देऊन अन्याय करण्याचे, किंवा इंग्लिश, फ्रेंच, एस्परॅन्टो जी, काय जागतिक व्यवहाराची भाषा ठरेल तिच्याबरोबरच आणखी हिंदी किंवा रशियन राष्ट्रभाषा शिकण्याची जबरदस्ती करून भाषा भगिनींत निष्कारण हेवेदावे निर्माण करण्याचें कारण काय ? जागतिक संघराज्य आणि संपूर्ण स्वायत्त भाषिक घटक त्यांच्यामुळेंच जगांत शांतता नांदणार आहे आणि जगाची सांस्कृतिक प्रगति किंवा जगांतल्या माणूस-कीचा विकास होणार आहे.

संतसाहित्यकांनीं शतकानुशतकें समृद्ध करीत आणलेल्या भारतांतल्या मराठी, गुजराती कानडी, बंगाली, तेलगु वगैरे भाषा ऐक्याच्या नांवानें नष्ट करून एकच राष्ट्रभाषा करूं पाहाणारे किंवा निरनिराळ्या भाषांऐवजीं जागतिक ऐक्यासाठीं जगाची एकच भाषा करूं पहाणारे हे नुसते वेडेपीरच नव्हे तर भरताच्या आणि जगाच्या खऱ्या ऐक्याचे आणि खऱ्या विकासाचे एक नंबरचे शत्रु आहेत. त्यांना ऐक्य नको असून जगाचा एकं सांचा किंवा एक ठोकळा बनवायचा आहे. एकता ही विविधतेंतूनच निर्माण होत असते. मराठी, बंगाली, कानडी वगैरे विविध भाषा आणि त्यांची विविध वाङ्मयें; धोतर, मुंडु, पगडी, फेटा, सुर्वार, सल्वार, पातळ, साडी, पैठणी, शेरवानी वगैरे विविध प्रकारची वेषभूषा, पुरणपोळी, इडली, रसगुल्ला, कोसी, घेवर वगैरे विविध पक्वान्नें या विविधतेंतच भारताचें, तसेंच जगाचें सौंदर्य आणि वैभव आहे, हें खोट्या एकतेचे पुजारी विविध रंगी फुलें नष्ट करून धोत्र्याच्या पांढऱ्या फुलांच्या बागा बनवतील आणि विविध वाद्यें फोडून किंवा तोडून टाकून संगीत म्हणजे फक्त ढोल बडवणें शिल्लक ठेवतील ! अनेक रंगांच्या संगतीनें एक इंद्रधनुष्य होतें किंवा अनेक सुरांच्या मेळाने नादब्रह्म होतें याची यांना कल्पना नाहीं. एकता आणि एकरूपता यांतला भेद यांना कळत नाहीं. ह्यांच्यापासून सावध राहून आपण खऱ्या एकतेची उपासना केली पाहिजे,

● ●

" खेकडे टोपलीत घालून ठेवतात; वर झांकण नको. त्यांतील कोणी निसटून जाईल ही भीति नसते. एखादा वर चढूं लागला कीं त्याचा कोणी भाईबंद त्याला खाली ओढून घेणारच. आमच्या मराठी माणसासारखेंच हें. "



# मराठी दुर्गुण

मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष

आम्हां मराठी माणसांत फार दुर्गुण आहेत असा सांप्रत काळीं पर-प्रांतांत बोभाटा आहे तो खोटा कसा असेल ? या दोनतीन पिढ्यांत महाराष्ट्र बहुतेक अघाड्यांवर मागें पडत चालला, त्याच्या मताला किंमत उरली नाहीं, त्याला पोरकी कळा आली ती काय सद्गुणांच्या प्रभावामुळें ?

हें त्याला माहीत नाहीं असें नाहीं. इतकेंच कीं त्याला त्याची फारशी फिकीर नाहीं. पुढें आणि मागें याबाबत त्यानें स्वतःच्या ठाम कल्पना करून घेतल्या आहेत; तेव्हां ' पुढें ' असलेल्यांकडे तो क्वचित् मान वळवून ' मागें ' पाहतो; त्यांची उपेक्षा करतो. हा त्याच्या अहंकाराचा भाग आहे.

अहंकार हा त्याचा मोठा दुर्गुण. याला कारण इतिहास आणि भूगोल. या खडकाळ, दरिद्री भूमींत त्यानें पिढ्यान्‌पिढ्या निसर्गाशी दोन हात केले; पण पोट पाठीला लागलें तरी शरणागति पत्करली नाहीं. या खडतर खुराकानें त्याचें काळीज मात्र घट्ट झालें, आणि कणा ताठ झाला. थोडा नाठाळपणा आला, आणि उर्मटपणाहि. इतिहासानें या ताठ्याला आणखी धार दिली. कोण्या एकेकाळीं मराठ्यांनीं स्वराज्य स्थापलें, साम्राज्य वाढविलें, या आठवणीची उचंबळ पुन्हां पुन्हां येत असते. अटकेपारच्या भराऱ्या, तंजावरची राजवट, सुरतेची लूट आणि बंगालवरील स्वाऱ्या हे आणि असले प्रकार त्याच्या अस्मितेच्या नित्यपाठांत असतात. आणि ते अशा अल्लड्-डुर्र स्वरांत कीं जणूं खाशा स्वारी आतांच तो पराक्रम उरकून आलेली आहे. हा इतिहासाचा ज्वर त्याच्या अंगी विशेष मुरला तो या शतकाच्या पहिल्या वीसपंचवीस वर्षांत. नव्या देशाभिमानाचें रूप त्यानें या जुन्या आदर्शांत पाहिलें; त्यांत काळ-विसंगतीची शंका त्याला आली नाहीं. इतका त्यांत तो हरवून गेला होता. 'भूत दिव्य ज्यांचें त्यांना रम्य भाविकाल' या विश्वासावर तो राहिला आणि हें दिव्य भूतकाळाचें देणें आपल्यालाच आहे, इतरांना नाहीं, अथवा असलेंच तर कंगाल प्रमाणांत अशी त्याची निष्ठा. त्यांतून कडवा अहंकार. ज्यांना खरोखरच फक्त तांत्रिक अर्थानें भूतकाळ आहे आणि फक्त पाठ्य-पुस्तकांपुरता कोमट इतिहास आहे त्यांना अर्थातच हा अहंकार फार बोचला. परिणामी महाराष्ट्राच्या त्या दुर्गुणाचा फार गवगवा झाला.

महाराष्ट्राला आणखी एक गर्व आहे तो आपल्या बौद्धिक उद्योगांबद्दल. संस्कृत विद्येसाठीं ( एकेकाळीं ) त्याची मोठी ख्याति. आतां ती पुष्कळच उतरली असली, आणि बहुशः तिचा व्याप परीक्षार्थी पुस्तकांच्या आवृत्त्या काढण्यापर्यंत संकुचित झाली असली तरी आम्ही ती विसरूं शकत नाहीं. निदान ' जगन्नाथ शंकरशेट ' शिष्यवृत्ति मिळविण्याची माफक शाळकरी महत्त्वाकांक्षा आम्ही जोपासतों; मुलांबाळांकडून संस्कृत पाठांतराची कवाईत करवून घेतों आणि कसल्याहि लेखनांत चुकतमाकत संस्कृत आणि संस्कृतासारखे दिसणारे शब्द वापरतो. एकंदर विद्येविषयीं तेंच. तिचा प्रसार करण्याच्या मिशनरी धडाडीनें कांहीं स्वार्थत्यागी विद्वानांनी शाळा-कॉलेजें काढण्याचा धडा घालून दिला. तो धडा इतक्या कसोशीनें गिरवला गेला कीं, उरली फक्त धडाडी; आणि कित्येकदां शिक्षण नको पण शिक्षणसंस्था आवरा असें म्हणण्याची पाळी आली आहे.

एकंदरीत संस्था काढण्याचें आधुनिक काळांत महाराष्ट्राला व्यसन फार जडलें. मराठी संस्कृतीची मक्का पुणें येथें नक्की किती संस्था आहेत याची मोजदाद तेथील ' गोखले इन्स्टिट्यूट ' सारख्या संस्थेच्या आंकडेशास्त्र्यांकडूनच करायला हवी. संस्था म्हटली कीं अध्यक्ष, कार्यवाह, खजिनदार हा किमान लवेदा आलाच. असल्या पदधाऱ्यांचे पुण्याच्या लोकसंख्येशी काय प्रमाण पडत असेल बरें ! प्रत्येक संस्थेला लहानमोठ्या अक्षरांत पाटी पाहिजेच. म्हणजे चित्रकलेची ती शाखा



अनुक्रमणिका








अनुक्रमणिका



## १०० वर्षांपूर्वीचे मराठी वर्तमानपत्र आणि त्याचे वाचक

दर्पण हें मराठींतील पहिलें वर्तमानपत्र. या वर्तमानपत्रांतील, तत्कालीन वाचकांचा पत्रव्यवहार मोठा मनोरंजक असे—दर्पणच्या १८३२ सालच्या अंकांतील हा उतारा —

दर्पणकार यांस—

विनंति विशेष. तुम्हीं जें वर्तमानपत्र छापायाचा प्रारंभ केला आहे त्याचे प्रस्तावनांत म्हटलें आहे कीं, विलायतेंतील काहीं उपयोगी विद्या आणि कळा यांचें ज्ञान एथील लोकांस होण्याकरितां त्याविषयीं ही काहीं लिहूं. म्हणोन मी विनंति करितों कीं, तुम्हीं वाफ यंत्राचा काहीं गोष्टी लिहाव्या. मी मुंबईस गेलों तेव्हां नवी टांकसाळ व शिडावांचून मोठें आगीचें गलबत म्हणतात तें वारा व पाणी हीं जेव्हां उलटीं असतात, आणि जेव्हां दुसरीं शिडांचीं गलबतें तसूभरही चालत नाहींत, तेव्हां वाफेनें फार त्वरित चालतें असें पाहिलें, तेव्हांपासून मला या विषयाचें काहीं जाणण्याची इच्छा झाली आहे. दुसरेही जे बहुत लोक मुंबईस गेले आहेत त्यांसही वाफेचा काहीं गोष्टी समजल्या असतां हर्ष होईल.

तारीख १६ माहे
जान्युआरी सन १८३२
मुक्काम पुणें.

प्रच्छक
—उ. स्थ.

भरभराटली. ही संस्थांची संवय इतकी जडलेली कीं तेथें अनेक दुकानें आपल्याला संस्था म्हणवून घेतात. गुन्हाळाची संस्था होते, धोब्याची होते, सायकली भाड्यानें देणाऱ्यांची होते, नवरानवरी मिळवून देणाऱ्यांची होते, सुईणीची होते तशी मुडदेफरासाचीहि. आणि परीक्षांसाठी "क्लासेस" चालविणाऱ्या पोटभरूंची होतेच होते. हरएक दुकान म्हणजे जर संस्था तर तेथील मंडईला "संस्थाई" का म्हणूं नये? असो. पण या बाजारी संस्था सोडल्या, तर हें म्हटलें पाहिजे कीं लोकसेवेसाठीं निघालेल्या संस्थांपैकीं बहुतेकांची पुंजी पाटीपलीकडे नसते. खोली नाहींच पण स्वतंत्र मेजहि नाही अशी कित्येकांची अवस्था. एका कार्यकर्त्याची ख्याति अशी कीं त्याच्या पैरणीचा एकेक खिसा म्हणजे एकेका संस्थेची कचेरी. सेवेची सगळी बिऱ्हाडें पाठीवर. त्याच्या पैरणीला झोळीवजा खिसे आणि किती तरी चोरकप्पे आहेत. शिवाय कनवटीला दोन संस्था आहेतच. या सगळ्या संस्थांच्या भरघोस पाट्या लटकतात त्या मात्र त्याच्या वस्त्रांवर नव्हे, त्याच्या दीडवीत खोलीबाहेर. अशा या पुण्याच्या पाटीवाल्या संस्था; तऱ्हेतऱ्हेचा भार वाहात असतात बिचाऱ्या! वाहात नाहींत फक्त द्रव्याचा—त्यांची वार्षिक उलाढाल तीन आंकड्यांपलीकडे नाहीं. तेवढें व्यवहारज्ञान नाहीं (या दुर्गुणाविषयीं पुढें) पैक्यासाठीं काम फुगवून दाखविण्याचें कसब नाहीं. आमचे कांहीं विद्वान् एखादें पुस्तक असें लिहितात कीं नर्मदेवरच्या एखाद्या गोट्यानें त्याची मांडणी तीनचार पुस्तकांत केली असती. शब्दांतहि काटकसर. (अर्थात्, उलट, निबंधाचा प्रबंध करणारे आपल्याकडेहि आहेत; पण ते थोडे.)

या संस्थांच्या सुळसुळाटावरून एकीला महाराष्ट्रांत 'महामूर पूर' झाल्याची अथवा भ्रातृभावाची पंढरी झाल्याची शंका येईल, पण ती व्यर्थ. 'परस्परां साह्य करूं, अवघे धरूं सुपंथ' हें अनेक संस्थांचे केवळ ब्रीदवाक्य. लौकरच संस्थेचे चार कार्यकर्ते तीन सुपंथ धरतात. त्यांतली जी जोडी जमते, ती आणखी दोघांना हाताशीं धरून, दुसरी संस्था काढते. अशी संस्थांतून संस्थांची वीण वाढते.

माणसांइतकेच मतभेद; आणि प्रत्येक मत अट्टाहासी. शिवाय जात–पोटजात, शाखा–उपशाखा, आपली पंचक्रोशी इत्यादि भेदकारणें आहेतच. आणि बुद्धि चिकित्सक; तेव्हां प्रत्येकाला दुसऱ्यांचीं मर्मस्थानें ठाऊक, म्हणून त्याचा उत्कर्ष अमान्य. तत्त्व म्हणून; स्वार्थासाठीं नव्हे. आमचे एक स्नेही म्हणतात, "खेकडे टोपलीत घालून ठेवतात; वर झांकण नको. त्यांतील कोणी निसटून जाईल ही भीती नसते. एखादा वर चढूं लागला कीं त्याचा कोणी भाईबंद त्याला खाली ओढून घेणारच. आमच्या मराठी माणसासारखेंच हें." वस्तुतः खेकड्यांचे डेंगे (म्हणजे हातपाय) मोठे अणकुचीदार असतात; पकडूं पाहाणाऱ्याच्या हातांतून रक्त काढतात. पण त्यांचा उपयोग एकमेकांना पाडण्याकडेच होतो!

संस्थांप्रमाणेंच सभा-संमेलनें, व्याख्यानें. यांची मराठी माणसाला मोठी आवड. पुन्हा एकदां महाराष्ट्राचें नाक जें पुणें त्याचा हवाला द्यावा. एका मे महिन्यांत माझा एक गुजराती स्नेही पुण्याला गेला. तेथील व्याख्यानें, त्यांचे विषय आणि जमणारा समुदाय पाहून त्याला अचंबा वाटला. काय लोक हे! नवकवितेचीं लक्षणें, युगोस्लावियाची राजनीति, सूफी पंथ, असल्या विषयावरील व्याख्यानें शेकडों श्रोते संथपणें

## गाथा सप्तशती

ज्यांचीं जणूं घट्ट गांठ बांधलेली आहे असे माझे बाहु त्यांनीं कसे तरी सोडविले आणि माझे स्तन जणूं त्यांच्या छातींत रुतले होते ते मी उपटून काढले!



नाता सप्तशती : १९५९

ऐकत बसलेले असतात ! पुन्हा वक्त्याला उपवक्ते आहेतच; मुद्दा खाली पडूं द्यायचे नाहींत. पुन्हा वर्तमानपत्रांतून चर्चा आहेच. कोणीतरी कोणाचा पाय ओढत असतो. मराठी नियतकालिकांतील पत्रव्यवहाराचे सदर जाणत्यांच्या दृष्टीनें यासाठींच सर्वांत अधिक वाचनीय असतें ! काय हा अखंड बुद्धि-विलास ! आपण कारकुनी पेशालाहि 'बुद्धि-जीवि' म्हणतो. परवांच एक शिक्षक सहज म्हणून गेले, "आज आठवीचें काळ-काम-वेगाचें बौद्धिक घ्यायचें आहे मला !"

या चिकित्साखोरीचें दुसरें अंग म्हणजे अश्रद्धेकडे कल. ही अश्रद्धा व्यक्तींच्या बाबतींतील, तत्त्वावरील नव्हे. एका माणसा-वरील निष्ठेनें त्याच्यामागून हजारों माणसें डोळे झांकून लोटत आहेत हा देखावा महाराष्ट्रांत सहसा दिसायचा नाहीं. अशा कळप-शक्तीनें होणारीं कार्यें महाराष्ट्राला जमलीं नाहींत— चांगलीं कार्येंहि. पण बुवांची येथें चलती नाहीं; त्यांची छाटी ओढणारे फार. संत निघाले ते यांतून तावून सुलाखून. तुकोबाच्या प्रभावानेंहि मंबाजी निर्वंश झाला नाहीं. आपल्या देशापुरता तरी हा काळ-विज्ञान-दृष्टीचा आहे तो विद्यापीठांतील विज्ञान-शाखेंतील व्याख्यानांप्रयोगांपुरता आणि मूठभर लोकांपुरता. एरव्हीं भक्तीचा डांगोरा जबरदस्त, आणि 'आत्मिक' 'आंतरिक' इत्यादि प्रकारांचा ! महाराष्ट्रांत तसला ओलावा कमीच; या कोरडेपणाची किंमत त्याला द्यावी लागते. त्याला (सध्यां तरी) सुकाळ नाहीं. हा कोरडेपणा वागण्याबोलण्यांतहि दिसतो. दरबारी आदब नाहीं, जन्मोजन्मीचे लागेबांधे असल्यासारखें तिऱ्हाइताशीं पायघोळ बोलणें नाहीं. उलट, भाषा थोडी तुटक, आणि आवाजाला जरा धार. घालून-पाडून बोलण्यांत आणि शिव्यागाळींत महाराष्ट्र इतर प्रांतांच्या मानानें कोठें आहे याबाबत तौलनिक संशोधन झालें पाहिजे. पोटासाठीं सुद्धां फार मऊपणा कोणी सहसा आणणार नाहीं; हाडाचा मराठी दुकानदारच पाहा; सलामी-लाच "काय" पाहिजे ? हें अशा स्वरांत म्हणेल कीं गिऱ्हाइकालाच चोरट्यासारखे व्हावें ! आवडनिवड दाखविल्यास किंवा घासाघीस केल्यास ताडकन् तोडेल. व्यापारीच का, भिकारीहि. तुम्हींच देणें लागता अशा आविर्भावानें भीक मागेल; कांहींसें बेफिकीरीनें आणि कांहींसें तुमच्या नैतिक शिकवणीसाठीं एखादें संतवचन तुमच्या तोंडावर फेकेल. गळा काढून घरची रडकथा सांगणार नाहीं; लाचारीनें तोंड वेंगाडणार नाहीं. भीक मागायची ती ठीक भिकाऱ्यासारखी मागावी !

—आणि, शेवटीं, महाराष्ट्राचा महान् दुर्गुण. त्याला काडीइतकेंहि व्यवहारज्ञान नाहीं; धंदा कसा चालवावा हें कळत नाहीं; पैसाअडका सांभाळायची आणि वाढवायची अक्कल नाहीं पैशाबाबत त्याची धांवच तोकडी. मराठी माणसानें सहसा बदमाषी केली तर ती पुळचट प्रमाणांवर. फार तर एखाद्या टीचभर सहकारी संस्थेच्या हिशेबांत गफलत करून दोनचार हजारांचा भित्रा डल्ला मारील तो. लाखांची अफरातफर सफाईनें करण्याची करामत त्याच्यांत नाहीं. मध्यम वर्गांतील माणूस घ्या. त्याची अचाट महत्त्वाकांक्षा म्हणजे एखादा दुसरा भाडोत्री ठेवून आप-ल्याला राहाण्याइतकें घर बांधायचें; आणि मुलांना कॉलेजांत पाठवायचें. नोकरींत बढती मिळाली कीं स्वर्गाला हात पोंचले ! कहर म्हणजे वैद्यकी अथवा वकिली अशासारख्या प्रतिष्ठित व्यवसायांत "खोऱ्यानें" पैसा ओढायचा. हें खोरेंहि, इतरांच्या मानानें, खेळण्यांतल्याएवढेंच ! पण असला व्यवसाय, किंवा नोकरी, करूनहि फावल्या वेळांत एखाद्या उद्योगधंद्यांत भागीदारी ठेवायची, शेअर्सच्या उलाढाली करायच्या. अस्सल धाडस आणि कसब त्याच्यात नाहीं. हे मध्यमवर्गीयांचे. श्रीमंतांचा वर्ग महाराष्ट्रांत आहे कुठें ? आम्ही श्रीमंत म्हणतो ते (एक) मोटर ठेवणाऱ्याला अथवा १०१ (अक्षरीं एकशें एक) रुपयाची देणगी देणाऱ्याला. या श्रीमंतीला इतर लोक हंसले तर तो त्यांचा दोष नव्हे. आम्ही देणगीसाठीं देखील हात पुरा उघडणार नाहीं. कोणी खैरात आरंभली तरी आम्ही बुजबुजत हजार-पांचशे मागूं— मग ज्यासाठीं मागायचें तें कार्य कितीहि मोलाचें असो. असल्या दरिद्री वृत्तीच्या लोकांना लाख आणि कोटी कोठचे ?

पुन्हां स्वार्थत्याग करूनहि असली मोठी माया जमविण्याची बुद्धी नाहीं. येथें नुसताच स्वार्थत्याग होतो. मग महाराष्ट्राला पुढारीपण कसें मिळणार ? फक्त बुद्धीच्या घमेंडीवर !

• • •








रशियांत क्रांति झाली, त्याचीं प्रतिकें चित्र-शिल्परूपानें जिवंत राहिलीं. अमेरिका, फ्रान्स, जर्मनी आदि देशांत फार काय चीन, जपानमध्यें सुद्धां क्रांतिदेवतेची भव्य स्मारकें चित्र-शिल्परूपानें अमर आहेत. महाराष्ट्रीय चित्रशिल्पी मात्र तसं कांहीं निर्माण करूं शकला नाहीं हा खेद आहे.



# चित्र शिल्प आणि आम्ही

**गोपालकृष्ण भोबे**

इसवी सनापूर्व कांहीं शतकें, आणि त्यानंतरच्या म्हणजे इसवी सनाच्या आठव्या नवव्या शतकांत ज्या उच्च दर्जाचें, स्वत्वाचा आविष्कार करणारें, अस्मिता जागृत ठेवणारें चित्र-शिल्प महाराष्ट्रांत निर्माण झालें, तेंच तेवढें महाराष्ट्राची चित्रपरंपरा दाखवणारें आदराचें स्थान. वास्तु, शिल्प आणि चित्र या तिन्हीं प्रांतांत आमच्या विकासाला त्याकाळीं उधाण आलें होतें. वेरूळ, घारापुरी, अजंठा, कार्ला इत्यादी लेणी, नाशिक, अंबरनाथ, सिन्नर, कोल्हापूर येथील भव्य आणि कलापूर्ण मंदिरें त्या काळांतल्या महाराष्ट्रीय कला क्षेत्रांतील बुद्धिवैभवाची साक्ष पटवतात. अभिमानानें बोट दाखवतां येण्यासारखी, महाराष्ट्राच्या संस्कृतीचे प्रतिक अशी चित्र-शिल्पकला ती ही ! फक्त एवढीच !

नंतरच्या कालखंडांत तसेंच सतराव्या शतकापासूनच्या धामधुमीच्या काळांत वैशिष्ठ्यपूर्ण अशा वास्तुशास्त्राचें 'किल्ल्याच्या' रूपानें दर्शन घडविणाऱ्या कलेव्यतिरिक्त चित्रकलेनें विशेष प्रगति केलेली दिसत नाहीं. परवशतेच्या पाशानीं आवळलेल्या महाराष्ट्राची परिस्थिति चित्रकलेच्या प्रगतीला अनुकूल नसावी. नाना तऱ्हेच्या आक्रमणानीं बेजार झालेला आणि सदैव स्वातंत्र्याच्या आंचेनें–आघाडीवर–तलवारीशीं आणि भाल्याशीं हातमिळवणी करणारा महाराष्ट्र कुंचल्याला आणि छिन्नीला विसरला असल्यास आश्चर्य तें कोणते ? मात्र अठराव्या शतकांत थोडेसें स्वास्थ्य लाभल्यानंतर तो या कलांकडे वळला; परंतु स्वातंत्र्यप्रियता ह्या एकमेव ध्यासानें चित्रकलेंतलें स्वत्व तो विसरला होता; आणि म्हणूनच इतर प्रांतातल्या स्वामित्वाचा परिणाम त्याच्यावर झालेला होता. विशेषतः 'मुगल शैलीचा' असर फार प्रबळ होता. राजपुत, कांगडा, बंगाली आदिंनी मुगल शैलीचं स्वामित्व मान्य केलं होतं, त्यांच्याकडून तसा आविष्कारही झाला होता. सारी चित्रकला एकाच शैलीनें व्याप्त होती, नामकरणें प्रांताभिमान्यानीं निरनिराळीं केलीं, इतकेंच ! राजपुत किंवा कांगडा शैलीच्या त्या काळांतल्या एखाद्या पौराणिक चित्रांत श्रीकृष्णाच्या डोक्याला मोंगल पद्धतीचा जिरेटोप सुरवार आणि झगा पाहून आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. नंतरच्या पेशवाईच्या काळांत षड्रस पक्वान्नें, घृतकल्या, मधुकल्या, संगीत आणि नाट्य यांच्या आहारीं गेलेल्या महाराष्ट्रानें पुन्हां ह्या कलेच्या उन्नतीकडे जी पाठ फिरविली ती कायमचीच ! फक्त दुसऱ्यांच्या कलेनें प्रभावित होऊन यदाकदाचित् त्याचें अनुकरण, आणि ती आत्मसात करण्याबद्दलचे प्रयत्न हीच एक प्रगति ठरली. केवळ चित्र-शिल्पांतच नव्हे तर ललित कलांच्या संगीतादि इतर प्रांतांतही या अनुकरणाचा प्रभाव इतका जबरदस्त फोफावत गेला, कीं त्याच विस्तारलेल्या वृक्षाच्या छायेखालीं आजतागायत आम्हीं –"दिली स्थिति देवानें तींतचि सुख मानी" असें समर्थन करून, विसावा घेत पडलेले आहोंत. इंग्रजी अंमलानें त्यावर शिक्का मोर्तब केल्यानंतर 'कलेच्या प्रांतांत महाराष्ट्राला स्वतःची अशी संस्कृति नाहीं,' 'या कामीं महाराष्ट्र इतरांच्या बरोबरीच्या देखील नाहीं,' किंबहुना 'कलाकौशल्याच्या बाबतींत अभिमान वाटण्यासारखं महाराष्ट्रापाशीं कांहींच नाहीं !" अशींही जबाबदार (!) —(हो, कारण तीं जाणत्यानीं केलेलीं आहेत)—विधानें केलीं गेलीं. भारताच्या मानानें नव्वद टक्के लेणी एकट्या महाराष्ट्रांत असून देखील, ही कला आमची महाराष्ट्रीयांची आहे म्हणून तिच्याकडे अंगुली निर्देश करायला देखील आम्हीं कचरावें, 'आमचे हात असावे, डोकीं नसावीं' 'कदाचित् परप्रांतीय कारागिरांना येथें आणून त्यांच्याकडून करवून घेतलीं असावीं' वगैरे शंकाकुशंकानीं आमच्या मनांत घर करावें, हा दैवदुर्विलास आहे. इंग्रजी राज्याच्या स्वामिनिष्ठेच्या प्रतिज्ञेबरोबरच आम्हीं आत्मनिष्ठ, स्वार्थपरायण आदि गुणांचा अंगिकार केला, आणि अस्मिता विसरलों,

विशाल मनें संकुचित झालीं, आम्हीं फक्त आपल्यापुरतेंच बघायला लागलों.

• एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत मुंबईत एक ‘ कलामंदिर ’ असावें अशी कल्पना १८५१ सालीं इंग्लंडांत गेलेल्या आणि तिथलीं कलामंदिरें पाहून आलेल्या ‘ जमशेटजी जीजीभाई ह्या श्रीमान आणि कलाप्रिय पारसी गृहस्थांच्या मनांत उद्भवली. ईस्ट इंडिया कंपनीच्या हवालीं त्यांनीं या कार्यासाठीं एक लाख रुपये केले आणि तें करतांना चित्रकला शिकवण्यासाठीं परदेशांतून तज्ञ आणावे अशीही एक अट घातली. १८७८ सालीं त्यांच्या कल्पनेनें मूर्त स्वरूप धारण केलें होतें. किप्लिंग, ग्रिफित्स्, टेरी ग्रिनवूड आदि साहेबां-बरोबर गणपतराव केदारी, सोकर बापूजी प्रभृति महाराष्ट्रीय गृहस्थही शिक्षवर्गांत होते. या कलामंदिरांत शिक्षण पूर्ण करून बाहेर पडलेल्या चित्रकारांची मतें विलायती माध्यमां-तून शिक्षण मिळाल्यामुळें पूर्णपणें बदललीं होतीं, महाराष्ट्रीय तर राहोच, परंतु भारतीय चित्रकलेची थोडीसुद्धां जाणीव त्यांना नव्हती.

त्यानंतरच्या ‘ सेसील बर्नस् ’ साहेबांच्या कारकिर्दीत दिल्ली दरबारच्या उद्घाटन प्रसंगी ‘ लॉर्ड कर्झन ’ यांनी “ हिंदी कलेला उत्तेजन देऊन सर्व तऱ्हेनें तिचा विकास करावा ” असा संदेश दिल्यामुळें कलाशिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांनीं हिंदी चित्रकलाच शिकावी असे फर्मान निघाले. “ राजा बोले दळ हाले ” या न्यायानें जिकडे तिकडे धांदपळ सुरू झाली. कलकत्ता स्कूलनें पाश्चात्य शिक्षण एकदम बंद करून पुराण्या मोंगल चित्रावरून प्रतिकृति करण्याचा हुकूम दिला. मात्र बर्नस् साहेबांना किंवा त्यांच्या तत्कालिन महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांना हिंदी चित्रकला कोणती या विषयींचें गाढं अज्ञान होतें. आणि त्याचें संशोधन सात आठ वर्षेंपर्यंत चालू राहून शेवटीं ‘अजंठा’ ‘एल्लोरा’ चा या लोकांना एकदांचा शोध लागला आणि मग प्रतिवर्षी चित्रकारांचा मेळावाही या क्षेत्रांची यात्रा करूं लागला. इंग्लिश माध्यमां-तून शिकलेल्या त्या काळांतल्या विद्यार्थ्यांनी केलेल्या अजंठ्याच्या चित्रांच्या कांहीं प्रतिकृति पाहून आज थोडेंसें हसूं आल्यावांचून राहात नाहीं. कलामंदिरांतून शिक्षण पूर्ण करून बाहेर पडलेल्या तत्कालिन विद्यार्थ्यांनीं पुढें आदर्श असा कोणताच निर्माण केला नाहीं. कुणी मास्तर झाले, कुणी नोकर झाले, आणि कुणी त्यांतल्या त्यांत खाजगी कामें करून स्वग्रामीं किंवा कर्मस्थानीं एखादी स्वतःची पर्णकुटी उभारून धन्यता मानून घेतली. भव्य दिव्य असें, भावी पिढीला आदर्श असें कांहींही त्यानीं निर्माण केलें नाहीं.

नंतरच्या पिढीच्या समोर मागल्या पिढीनें मिळवलेल्या थोड्याशा यशाची ईर्षा होती. आणि महाजनांनीं मळवलेल्या वाटेनें तेही जायला लागले. विकास एवढाच झाला, कीं पर्णकुटी ऐवजीं त्यानें स्वतःला दगडाच्या घराची सावली निर्माण केली.

चित्रकला खेरीज करून या काळांत इतर सर्व प्रांतांत जागृति होत होती. परदास्यांच्या श्रृंखलांचे बंद तोडायला वाङ्मयानें असिधाराव्रत स्वीकारलें होतें. लोकक्षोभ निर्माण झाला होता, संक्रमणाचा हा काल होता; परंतु चित्र शिल्पांत कसलीही क्रांति झाली नाहीं. या साऱ्या वाता-वरणाचा त्यांच्यावर कसल्याही तऱ्हेचा परिणाम होत नव्हता. ते सुस्त होते; आपला स्वार्थ साधण्यांत चुस्त होते.

संत वाङ्मयानें जी सहिष्णु परात्पर अशी शिकवण दिली, पुरातन लेण्यानीं ज्या विशाल सांस्कृतिक जाणिवेची शिकवण दिली, हे सारे आदर्श त्यांच्या डोळ्यांसमोर असतांना त्यांनीं अंधानुकरण केलें. अल्प संतुष्ट वृत्तीचा आदर्श मात्र निर्माण करून ठेवला.

रशियांत क्रांति झाली, त्याचीं प्रतिकें, चित्र–शिल्परूपानें जिवंत राहिलीं. अमेरिका, फ्रान्स, जर्मनी आदि देशांत फार काय चीन, जपानमध्यें सुद्धां क्रांतिदेवतेची भव्य स्मारकें चित्र शिल्प-रूपानें अमर आहेत. महाराष्ट्रीय चित्र–शिल्पी मात्र तसें कांहीं निर्माण करूं शकला नाहीं हा खेद आहे. शिवकालीन क्रांतींचीं खंडीत अशीं किल्ल्याची प्रतिकें हेंच आमचे कलाशिल्प. आम-च्याजवळ कांहीं झाले नाहीं म्हणूनच कदाचित् अजंठा, केरळ, कार्ला इत्यादि पूर्वजांनीं ठेव-लेल्या लेणींरूपी इस्टेटीकडे ‘ आमची ’ म्हणून बोट दाखवतांना आम्हाला भीति वाटत असावी. विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात कॅप्टन ग्लॅडस्टन सॉलोमन साहेबांच्या कारकिर्दीत हिंदी चित्र-कलेची थोडीशी तोंडओळख विद्यार्थ्यांना झाली होती. अजंठा, वेरूळमधील मूळ चित्रें नजरे-समोर ठेवून, रंग रूपानेंच त्यांत थोडासा बदल केला होता. या व्यतिरिक्त मोठीशी प्रगति झाली नाहीं. बंगाली चित्रकारांनी मात्र परिस्थितीची योग्य तोंड ओळख पटवून घेऊन, लोककलेचे उत्खनन करायला सुरवात केली. आणि आपल्या कलेवरचे विलायती संस्कार झुगारून देवून, काळाची पावलें ओळखून उदयाचा मार्ग शोधून काढला, अवनींद्रनाथ ठाकूर, यामिनी रॉय, नंदलाल बोस, चौधरी आदिनीं समय सूचक-वृत्तीनें नवा मार्ग चोखळला. बंगाल्यांतल्या नव्या पिढीला तो आदर्श ठरला. आणि सारा जमाना बदलून टाकायला हे लोक कारणीभूत झाले. हा जवळचा झालेला बदल दृष्टीसमोर असून त्या तशा क्रांतिकारक परिस्थितींत देखील महा-राष्ट्रांत मात्र कुणीही युगप्रवर्तनाला कारणीभूत झाला नाहीं. नवा आविष्कार व्हावा म्हणून झुंज दिली गेली नाहीं. एरवीं सर्व बाबतींत नेहमींच आघाडीवर असणाऱ्या महाराष्ट्राला चित्रकलेनें तेवढे लाजविलें होतें, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.

कुठें अश्वारूढ शिवाजी महाराजांचा पुतळा, किंवा १८५७ चे स्मारक म्हणून झांशीच्या राणीचें काल्पनिक असें सामान्य बाईवजा चित्रण, एवढ्यातरी प्रगतीच्या खुणा दृष्टीगोचर होतात हें महद्भाग्य ! प्रचंड स्मारकें दिसतात तीं हींच ! रशियांतल्या कामगार विजयाचें स्मारक–शिल्प पाहिलें तर नसन् नस जागृत होते. अमेरिकेच्या स्वातंत्र्य देवतेचे अति भव्यशिल्प पाहून डोळ्यांचें पारणें फिटतें. आपल्याकडे असें न व्हायचें कारण कदाचित् परिस्थिति असावी. राजाश्रयाचा तेवढा जोरकस अभाव, वगैरेही कारणें असावीं. आपलेंच दुर्दैव, दुसरे काय ? असो ! बर्नस्साहेब आणि कॅसोलॉ-मन्साहेब यांच्या अमदानींत कलामंदिरांत साधना करून बाहेर पडलेल्या कलावंतांनीं त्याच परंपरेस अनुसरून विद्यालयें वगैरे काढून पुढच्या पिढींत या कलेबद्दलची आवड निर्माण केली, आस्था निर्माण केली. आणि कलावंताबद्दलच्या समाजाच्या भावनांना थोड्याशा वरच्या थराला नेलें. ‘ राफ्रां, ’ ‘ लियोनार्द विन्सी ’, ‘ टिटियान ’ आदि पाश्चात्य चित्रकारांच्या अतिभव्य अशा निर्मि-तीचा आदर्श त्यांच्या दृष्टिसमोर होता; परंतु फक्त आदर्श होता एवढ्यावरच हें कौतुक थांबवले पाहिजे, कारण तशी एकही भव्य कलाकृति कुठेंही निर्माण झाल्याचें दृष्टि पथांत नाहीं. कांहीं फारच थोड्यानां तशी रंग-

संगतो अगदीं अल्प प्रमाणांत साधली होती म्हणतात, ( उदाहणार्थ त्रिन्दाद वगैरे, ज्याला ते पूर्वेकडचा 'राम्ब्रां' म्हणत ) परंतु आपलें आपसांतच आपण समाधान मानायचें याहून दुजें काय ?

अशी ही आहे त्यांत समाधान मानायची परिस्थिति, विसाव्या शतकाचं पहिलं अर्धशतक संपायला आलं होतं तरी कायम होती. युरोपांतल्या कलासृष्टींत प्रचंड क्रांति होऊन साऱ्या माध्यमाची उलथा पालथ झालेली आहे, 'वॅंगगॉग', 'पॉल गोगां' वगैरे नांवाचे नामस्मरण तेथील लोकांच्या ओठांवर सारखे चालूं आहे, इत्यादि गोष्टी येथील लोकांपर्यंत पोंचल्याही नव्हत्या; परंतु जोरानें खळाळून वाहणारा त्या नवप्रवाहाचा झोत इथपर्यंत यायला जरी थोडासा अवधी लागला, तरी तो एकदां येऊन जो थडकला त्यानें जोराची मुसंडी मारून मरगळलेल्या मनाला जागें केलें. ठराविक चाकोरींतून जाणारीं परंतु जात्याच बंडखोर मनाचीं अशीं कलावंत हृदयें खडबडून जागीं झालीं. आणि त्यांनीं या नव्या प्रकाशझोताचें आव्हानपूर्वक स्वागत केलें, हृदयाला पीळ पाडणारें, दिव्यत्वाचा साक्षात्कार घडवणारें, साक्षात्कारी, निर्गुण, निराकारी, भाववाचक असें कांहींतरी आपण निर्माण केल्याशिवाय यापुढें आपणाला स्थान उरणार नाहीं, दिवसेंदिवस क्षणाक्षणाला, कणकणानें, झपाट्यानें बदलणाऱ्या युगांत जुन्या चाकोरीलाच मिठी मारुन बसल्यानें आमचा अधःपात झाल्याशिवाय राहणार नाहीं याची त्यांना खात्री झाली, आणि नव्याचा स्वीकार करतांना होणाऱ्या अडचणींना तोंड द्यायला ते बद्धपरिकर झाले. इथें स्वार्थ सोडला पाहिजे, आत्मनिष्ठता सोडली पाहिजे हें त्यांना पटलें होतें. पर्णकुटीचा आश्रय तर राहोच; परंतु घड योगक्षेमहि आपल्याला चालवतां येणार नाहीं याचीहि त्यांना जाणीव होती; परंतु हें सर्व आकळलें असतांना सुद्धां एकदां त्यांच्या बंडखोर वृत्तीला जी जाग आली ती त्यांना स्वस्थ बसूं देईना. रोमरोमांत भिनलेल्या सदैव आघाडीवर राहणाऱ्या महाराष्ट्रीय वृत्तीनें पुन्हां उचल घेतली. आणि अधिकाधिक तो नवें शोधायला लागला.

हें सारें होत असतांना यालाही थोडेंसें अंधानुकरणाचें गालबोट लागलेलें आहे. नाहीं असें नाहीं. परंतु अनुकरण हा एक शाप जो–कित्येक शतकें झालीं—महाराष्ट्रानें आपल्यावर लादून घेतलेला आहे त्याचा थोडासा तरी परिणाम नव्या पिढीवर झाल्याशिवाय कसा राहील ! साहेबांच्या हॅट, पाटलोण, बुटानीं तर आपल्याकडे अढळपद मिळविलेंच आहे. फार काय सिंधी स्त्रियांची सर्वांग दाखवणारी, उरोजांचें फाजील प्रदर्शन पदर ढळवून करणारी पद्धति आपण चटकन उचलली नाहीं काय ? तरी पण नव्या पिढीनें अंगिकारलेला मार्ग आणि त्याचा शीघ्र गतीनें होत असलेला विकास पाहून त्यांचा भविष्यकाल उज्ज्वल आहे याबद्दल आशा वाटते. आणि भावी यशाचें हें स्वप्न खरें होईल किंवा काय याचा निर्णय देणें काळाच्या हातीं आहे !



## व्यथा—

पायमशिनच्या मुड्ग्यालतीं
पेशी पेशी या जीवाची
चांदण्यांतला रेशिमधागा
विणितो चित्रें गतस्मृतींचीं

तनु जखमांची त्वचा पांघरी
जखमीं ठिबकें गार चांदणें •
लाल होउनी गळें, चाटतीं—
तळमळणारी पिवळीं पानें

चांदण्यावरीं दिसे गोंदला
आकाशाचा निळसर ठिपका •
विधवा जाणिव अशीच दिसुनी
करुणपणानें देत हुंदका

उंच मनोरा घड्याळ त्यावर
विषण्णतेनें घुमवी ठोका
जाळ्यापरि थरथरुन चांदणें
जखमांनाही बसे आचका

व्यथेस फुटती ओठ दिशांचे
आ वासुन ती रडे उताणी
गळ्यांत स्थिरचर तिच्या आडकें
फुटे न रडें...स्वर झरती नयनीं !

— शंकर वि. वैद्य



## 'दिग्दर्शन' म्हणजे
## मराठी भाषेंत सर्व विषयांचा संग्रह

'दिग्दर्शन' हें महाराष्ट्राचें पहिलें मासिक १ मे १८४० रोजीं त्याचा पहिला अंक प्रसिद्ध झाला त्यापूर्वी निघालेलें मासिकाचें हें माहितीपत्रक—

हें लहान पुस्तक महिन्यास एक छापणार. या पुस्तकांत बातमीचें सार, व भूगोल, इतिहास, पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र व साधारण विद्या यांविषयीं थोडथोडा मजकूर, दुसऱ्या ग्रंथांतून घेतलेला, किंवा नवा लिहिलेला छापला जाईल. व प्रसंगोपात्त समजूत पडण्याकरितां दगडावर छापलेले नकाशे, चित्रें वगैरे यांत असतील.

हें पुस्तक महिन्यांतून एक वेळ छापलें जाईल. व एक एका अंकांत २० पासून ३२ पृष्ठें ( एक एका कागदाची आठ या सांच्याची ) असतील. त्यास किंमत दरमहा अर्धा रुपया व आगाऊ म्हणजे वर्षाच्या पहिल्या महिन्यांत मिळाल्यास पांच रुपये पडतील.

राजे चवताळले होते, लालबुंद झाले होते आपली वज्रमूठ टेबलावर आपटीत ते यशवंतराव चव्हाणांना म्हणाले " छान छान ! मराठी राज्याची चांगलीच जिम्मेदारी सांभाळणार तुम्ही ! " गोब्राह्मण प्रतिपालक क्षत्रिय कुलावंतस छत्रपती शिवाजी भोंसल्यांचे खदिरांगारासारखे शब्द ऐकून यशवंतराव अधांतरी उडाले—

# सचिवालयांत शिवाजी



शेलारमामा

मुंबई सरकारच्या सचिवालयाचा कारभार सुरूं झाला होता. रोज नियमानें उशीरां येणारे आणि लवकर जाणारे गॅझेटेड जातीचे साहेब लोक अजून डुलत डुलत कचेरींत येत होतेच. बिलंदर, पण गेंड्याच्या कातडीचे सुपरिंटेंडेंट, वरून साळसूद पण आंतून महावस्ताद असे सिनीयर क्लार्कस, नखरेबाज, रिकामटेकड्या आणि ऑफीसची केवळ शोभा असणाऱ्या नखरेल सुलभा, कुंदा आणि आशा इ. लोकप्रिय मंडळी, टरेबाज आणि कामचुकार शिपाई, हे सारे सरकारी आधारस्तंभ कामाला लागल्याचा आविर्भाव करीत होते.

अशा वेळीं सचिवालयांतील जनतासंपर्काधिकाऱ्याच्या अस्ताव्यस्त कचेरींत एक ऐतिहासिक नाटकांत शोभेल अशी व्यक्ति शिरली. या गृहस्थाचा पोषाख म्हणजे सुरवार, मराठेशाही अंगरखा टोंकदार दाढी आणि कंबरेला एक छोटा जंबिया. कामाची वेळ असल्यामुळें संपर्काधिकारी जागेवर नव्हते. मात्र संपर्ककारकून अनाळकरांची 'झुंजार कथा' वाचण्यांत गर्क झाला होता. पण आमच्या ऐतिहासिक व्यक्तीनें त्यांची तंद्री मोडली.—" काय हो तुमचे मुख्य प्रधान यशवंतराव चव्हाण कुठं बसतात ? "

कारकूनमहाशय अजून झुंजारच्या साहसांत गर्क होते. त्यामुळें त्यांना हा प्रश्न ऐकूंच गेला नाहीं. त्यावर चिडून आमच्या ऐतिहासिक व्यक्तीनें परत तोच प्रश्न दुप्पट मोठ्या आवाजांत उच्चारला ?

त्याबरोबर कारकुनाची तंद्री भंग पावली. खुर्चीवरून न हलतां त्यानें विचारलें " येस् व्हॉट कॅन आय डू फॉर यू ? "

" हे बघा, तुमची टोपीवाल्यांची भाषा आम्ही शिकण्याची तसदी घेतली नाहीं. चांगल्या मऱ्हाटी भाषेंत बोला—"

" – काय पाहिजे आपल्याला ? " कारकूनानें विचारलें.

" मला यशवंतराव चव्हाण पाहिजेत "

" असं - म्हणजे सी. एम्. ची गांठ घ्यायचीय होय—मग असं करा तडक त्या लिफ्टनें, किंवा व्यायाम करायचा असेल तर जिन्यानें तडक एकदम वरच्या मजल्यावर जा. तिथें सी. एम्. चं. ऑफीस कोणीहि दाखवील. "

" शी. एम् चं ऑफीस–ही काय बेवकुफी आहे ? "

शी. एम् नव्हे—सी. एम्. म्हणजे चीफ मिनीस्टर—म्हणजे मुख्य प्रधान—"

" अस्सं—म्हणजे इथं टोपीवाल्याची भाषा—"

इतकं बोलून आमच्या ऐतिहासिक व्यक्तीनें त्या कारकुनाकडे ढुंकूनहि न पाहातां—तो ताडताड सारे जिने वर चढून सहाव्या मजल्यावर आला. तेथं मुख्य प्रधानांच्या भेटीसाठीं एक डझनभर









अनुक्रमणिका

तरी चिंतातुर जीव ताटकळत होते. त्यांत कांहीं पांढऱ्या टोपीचे-- तर कोणी मुंडासेवाले—तर एक लाल चुटुक ओठ रंगवली युरोपियन--!

पण आमच्या ऐतिहासिक व्यक्तीला तसं ताटकळत बसणं फारसं पसंत नव्हतं असं दिसलं. कारण त्यानें मुख्य मंत्र्यांच्या शिपायाची गांठ घेतली. त्यानें अक्षर न बोलतां कागद आणि पेन्सील पुढें ठेवली. त्यावर आमचा पाहुणा भडकला " हा काय प्रकार आहे—राजाला भेटायला इतका जुल्म ? "

शिपाई म्हणाला " यांत कसला जुल्म आला. ही सरकारी रीतच आहे." त्यावर आमचा पाहुणा आणखी भडकला. तो म्हणाला—"ये रीत–मै नहीं जानता—ए शिपुरड्या जास्त गडबड केलीस तर गर्दन छाटून टाकीन. " असं म्हणून खरोखरच त्यानें त्या शिपायाची बखोटी धरली–त्याबरोबर जवळ बसलेले दोन गुजराती पुढें आले आणि म्हणाले—" अरे तुमी खालीपिली झगडा कशाला करतो ? चवाणसाब लई चांगला मानस हाय–आंत जावा नी खुशाल भेटा– पण झगडा करूं नका. "

" अच्छा ! याला आम्हीं सोडून देतों तर " असे म्हणून आमच्या पाहुण्यानें तडक यशवंतरावांच्या खोलींत प्रवेश केला. यशवंतराव फायली वाचण्यांत अगदीं गर्क झाले होते. पण आमचा पाहुणा दाणदाण करीत आंत शिरल्यावर त्यांचें सहाजिकच लक्ष गेलें. त्यांनीं स्मित हास्य केलें आणि हात पुढें करून खुर्चीवर बसायची विनंति केली.

" काय नांव आपलं ? " यशवंतरावांनीं विचारलं.

" आमचं नांव शिवाजी भोसले. "

" अस्स ! नांव छान आहे—बरं पण कुठल्या गांवचे ? "

" पुणं जिल्ह्याचें ! "

" फार छान—म्हंजे मावळांतले असाल–मग काय जमीनविमीन शेतीवाडी–आहे का ?—कसलं काम काढलंय ? "

" काम कांहीं नाहीं. तुम्हाला भेटायला आलोंय ! "

" तें दिसतंच आहे पण जमीनीचं काम असेल तर रेव्हेन्यू मिनीस्टरना भेटा. पण तुम्हाला–नाटककंपनीला वगैरे मदत हवी असेल तर आमच्या नाशिकराव तिरपुड्यांना भेटा—आणि हें पहा, असं सरकारी कचेऱ्यांत येतांना हा नाटकी पोशाख आणि हे कल्ले— आणि जंबिया हीं सोंगं कशाला ? "

" म्हणजे तुम्ही मला समजलांत कोण ? " पाव्हणा चवताळला.

"मी चांगलाच समजलोंय–मला वाटतं आपलं शहाशिवाजी मधलं काम मी पहिलंय—छान काम होतं." यशवंतराव कौतुकानें म्हणाले.

यशवंतरावांच्या या कौतुकानें शिवाजी भोसले अधिकच चिडला. तो म्हणाला " तुम्हाला खराखुरा शिवाजी भोसले आणि नाटकी भोसले यांतला फरक कळूं नये अं ! छान छान ! मराठी राज्याची चांगलीच जिम्मेदारी सांभाळणार तुम्ही—"

" म्हणजे—" त्याचा चढलेला स्वर पाहून यशवंतराव जरा चमकलेच !

" म्हणजे—म्हणजे काय ? चांगला मामला आहे ! मी दुसरा तिसरा कोणी नसून गोब्राह्मणप्रतिपालक क्षत्रियकुलावतंस छत्रपती शिवाजी राजे भोसले—"

'मी शिवाजी राजे भोसले' हे शब्द ऐकतांच यशवंतराव दचकले ते म्हणाले—"काय तुम्ही शिवाजी राजे —"

" होय—आम्हीच शिवाजी राजे -- ज्याचे पुतळे उभारण्यांत तुम्ही गर्क झालां आहांत, ज्यांची जयंति तुम्ही साजरी केली—तोच मी शिवाजी—" असं म्हणून शिवाजी राजांनीं आपली मूठ टेबलावर आपटली.

त्याबरोबर यशवंतराव--एकदम अर्धांतरी उडालेच. " काय-- खरंच तुम्ही शिवाजी—अगदीं जवाहरलाल शपथ "

" कोण हा नवा देव ? "

" देव नाहीं पण देवासारखा आमचा पंतप्रधान—पण तें जाऊंदे महाराज आपल्याला न ओळखतां थोडी गलती केली म्हणून क्षमा करा--" असं म्हणून यशवंतरावांनीं अक्षरशः शिवाजी राजांचे पाय धरले.

" यशवंतराव उठा—कसली फिकीर करूं नका. आमचें तुम्हाला अभयदान आहे. "

शिवाजी राजांच्या या अभयामुळें यशवंतरावांना धीर आला. ते

विनयानें खाली जाजमावर बसले. पण शिवाजी राजांनीं त्यांना खुर्चीवरच बसायचा आग्रह केला. ते म्हणाले, " प्रधानजी—किती झालं तरी तुम्ही या राज्याची शान राखली पाहिजे. बसा या चौपाईवर. "

यशवंतराव लाजत लाजत खुर्चीवर बसले. त्यांनीं वेल वाजवली. आणि शिवाजी राजांना म्हटलें. " काय घेणार आपण ? "

" काय घेणार ? आम्ही किल्ल्यांशिवाय कांहींच घेत नसतों—आम्ही आलों आहोंत राज्य बघायला. "

" जरूर जरूर. बंदा आपल्या सेवेला हजर आहे. हें राज्य आपलेंच आहे. आपलाच वारसा आम्ही चालवीत आहोंत. "

" आमचा वारसा—भलती वटवट बंद करा—आमचा वारसा चालवायची तुमची काय हिंमत आहे ?—काय तुम्हाला घोड्यावर बसतां येते ? दांडपट्टा येतो—तलवार–बंदूक हातीं धरतां येते ? काय येतं काय तुम्हांला ? पण तें जाऊं द्या—आमचा वारसा कसा काय चाललाय तेंच बघायला आम्ही आलों आहोंत. जा—त्याचा बंदोबस्त करा. "

लागलीच यशवंतरावांनीं प्रसिद्धि प्रमुखाला बोलावून घेतलं. सांगितलं कीं शिवाजी राजांच्या आगमनाची प्रेस नोट काढा. आतां त्यांना आरे मिल्क कॉलनीला न्यायचंय. नंतर प्रेस कॉन्फरन्स—आणि संध्याकाळीं चौपाटीवर भाषण. रात्रौ राजभवनमध्यें खाना. "

प्रसिद्धि प्रमुखांनीं लागलीच धांवाधांव करून शिवाजीराजांच्या आगमनाची बातमी वृत्तपत्रांना कळवली. रेडियोवरूनहि लागलीच बातमी जाहीर करण्यांत आली. लागलीच मराठी वर्तमानपत्रांचे खास अंक निघाले. शिवरायास शतशः प्रणाम या मथळ्यांनीं आणि सर्व अंक प्रसिद्ध झाले. शिवाजीच्या आगमनाची बातमी पाकिस्तानांत पोंचून पाकिस्तानांत घरबराट सुरू झाली. " शिवाजी आया अभी बख्त बांका है " म्हणून पाकिस्ताननें सरहद्दीवर लष्करी जमवाजमव सुरू केली. शिवाजी एकदम आला तो तडक महाराष्ट्रद्रोही यशवंतराव चव्हाणांकडे गेला म्हणून संयुक्त महाराष्ट्र समितीचे कार्यकर्ते आणि पुढारी खवळले. तर डांबरवाले थिटे यांनीं शिवाजीच्या निषेधार्थ सचिवालयासमोर सत्याग्रह केला. शिवाजीराजांच्या आगमनाची कम्युनिस्टांच्यावर फार वेगळी प्रतिक्रिया झाली. हुकुमशाहीचा प्राचीन आधारस्तंभ म्हणून आतां शिवाजीसारख्या प्रतिगामी राजकीय पुढाऱ्याची भारताला कांहींच आवश्यकता नाहीं. असें मत त्यांनीं मांडलें. विनोबा भाव्यांनीं शिवाजीला तार पाठवली कीं आपण भूदानाच्या कार्यास वाहून घेतल्यास भारताची प्रगती जोरावेल. पंतप्रधान पं. नेहरूंनीं तर शिवाजीराजांचा सहकारी चळवळीला आणि तिसऱ्या पंचवार्षिक योजनेंत फार उपयोग होईल असा विश्वास प्रकट केला. मुंबईच्या एका सनसनाटी पत्रानें तर पंतप्रधान नेहरूंच्याऐवजीं शिवाजीराजेच पंतप्रधान म्हणून दिल्लीस येणार असें जाहीर केलें. शिवाजीच्या आगमनामुळें खरा आनंद वाटला गोव्याच्या लोकांना. शिवाजी आणि पोर्तुगीज यांचें जुनें वैर लक्षांत घेतां गोव्याचा प्रश्न चुटकीसरशी सोडवण्यास योग्य पुढारी कोण असेल तर तो शिवाजीच आहे असा विश्वास त्यांनीं प्रकट केला. बेळगांव कारवारची मंडळीहि शिवरायाच्या आगमनानें खूष झाली. कारण कर्नाटकांत स्वारी करून शिवाजीनें कानडी-आप्पांची चांगलीच हबेलंडी उडवली होती. त्यामुळें या सीमेवरच्या भागांत शिवाजी महाराजांचा दौरा काढला तर जत्ती बिनबोभाट शरण येईल असा बेळगांव–कारवारच्या जनतेच्या मनांत भरंवसा निर्माण झाला. याशिवाय वाटल्यास यशवंतरावांचे कान धरून त्यांना राजीनामा द्यायला लावल्यास केवळ शिवाजी महाराज समर्थ असल्यामुळें बेळगांवच्या मराठी साप्ताहिकांनीं शिवाजीराजांना आपलें एकमुखी आवाहन प्रसिद्ध केलें होतें.

शिवाजी आल्याची बातमी मिळाल्यापासून जगाच्या कानाकोपऱ्यांतील वार्ताहर जमा झाले. अर्थात् बातमीदारांना मुलाखत देतांना त्यानें पुण्या-मुंबईच्या वर्तमानपत्रवाल्यांना खास सवलती दिल्या.

शिवाजी राजांच्या मुलाखतीसाठीं मुंबईतल्या बड्या बड्या शेट मंडळींचीं आर्जवें आलीं. शिवाजीमुळें आतां संयुक्त महाराष्ट्र खासच होणार तेव्हां आम्हीं आतां मुंबईंत रहावं कीं नाहीं याचा खुलासा करून घेण्यासाठीं त्यांनीं मुलाखत मागितली. पण गर्दीमुळें शिवाजीनें मुलाखतीस अफसोस है म्हणून नकार दिला. मुलाखत घेणाऱ्यांच्या रांकेंत मुंबई–मद्रासचे सिनेमावालेहि होते. शिवाजी आपल्या बोलपटांत काम करील पिक्चर एकदम बॉक्स ऑफिस हिट् ठरेल अशी त्यांची खात्री असल्यामुळें त्यांनीं एका चित्रपटासाठींच ५० लाख रुपये देऊं केले. पण शिवाजीराजांना या सिनेमावाल्यांबद्दल अतोनात राग आणि तिरस्कार दिसला. मुख्य प्रधानांना माझ्यावर चावट आणि बेइज्जतीचे सिनेमा काढणाऱ्या सिनेमावाल्यांना तोफेच्या तोंडीं द्या, किंवा सिंहगडावरून त्यांचा कडेलोट करा अशी त्यानें आज्ञा केली. कांहीं नाटकवाले माझी सोंगं नाचवून माझी अब्रु खराब करतात यासाठीं असल्या नाच्या पोऱ्यांना सरकारी तनखा देण्याचा तमाशा बंद करा आणि या बेवकूफ लोकांना अंधारकोठडी दाखवा अशी त्यानें यशवंतरावांना विनंति केली.

शिवाजीच्या आगमनामुळें खरा घबराट उडाला असेल तर पुण्याच्या इतिहास संशोधक मंडळींत. त्यांना वाटलं आपला हा इतिहास संशोधनाचा बुडबुडा आतां फुटणार आणि आपली गर्दन मारली जाणार.

इतक्यांत पुणें नगरपालिकेनें शिवाजीराजांना मानपत्र द्यायचें ठरविलें पण त्याला समितीपक्षाच्या पंधरा सभासदांनीं कडकडीत विरोध केला. राजांनीं महाराष्ट्रद्रोही यशवंतरावांकडे न उतरतां मराठा पत्राच्या 'शिवशक्ति' या कचेरींत उतरणें अधिक युक्त आणि उचित झालें असतें. पण त्यांनीं आमचा मनोभंग आणि मराठी माणसांच्या भावनांचा अपमान केला; असल्यामुळें आम्हीं त्यांच्या मानपत्राला विरोध करीत आहोंत. ही बातमी राजांच्या कानीं जातांच ते चिडले आणि पुण्यास जाण्याचा बेतच त्यांनी रद्द केला.

इकडे 'खाशांच्या स्वाऱ्या आरे मिल्क कॉलनीकडे निघाल्या वाटेंत मुंबय बेटाचं हें बदलेलं स्वरुप पाहून राजांना मोठी मौज वाटली. वाटेंत दुतर्फा लोकांची गर्दी आणि फुलांचा वर्षाव पाहून राजांना आपल्या आग्र्याच्या भेटीची आठवण झाली. वाटेंत शिवाजी पार्क लागला तेथें हजारों लोक राजांच्या स्वागतार्थ जमले होते. 'शिवाजी महाराज कीं जय' अशा गगनभेदी आरोळ्या

दुमदुमत होत्या. त्या नंतर माहीम, वांद्रे, खार—थोड्याच वेळांत आरे मिल्क कॉलनी आली. " या गौळवाड्यांतून आम्हीं मुंबईच्या लोकांना दूध पाजतों. " खुरोडी मिल्क कमिशनरनीं माहिती दिली. राजे म्हणाले, " हा आरे गौळवाडा कसला. याला म्हैसवाडा म्हणत जा. इथं तर एकहि गाय दिसत नाहीं." त्यावर खुरोडी चमकले. अरेच्या, म्हणजे आपण गौळवाडा म्हणत होतो तें चुकलंच तर. शेवटीं यशवंतरावांनीं एका बाटलींतलं दूध राजांच्या समोर केलं. कसा काय वाटला आमचा गौळवाडा ? यशवंतरावांनीं विचारलं. राजे म्हणाले, " तुमचा हा म्हैसवाडा म्हणजे दौलतीची खरांगोळी आणि अधिकाऱ्यांची मोगलाई. तुम्ही म्हणे बाटल्यांतून उंदीरहि पुरवतां—बस करा हा तमाशा आणि तुम्ही तुमच्या बंगल्यांत चार दोन म्हशी पाळा आणि बेटांतल्या लोकांनाहि बरोबर म्हशी पाळायला सांगा. " यशवंतराव म्हणाले—ठीक आहे आपल्या आज्ञेप्रमाणें उद्यांच म्हशी पाळायला लागतो. त्यावर राजे म्हणाले, " तुम्ही एकटेच नव्हे—तुमच्या दुसऱ्या प्रधानमंडळींना म्हशी पाळावला लावा. म्हणजे निदान पुढच्या निवडणुकींत गवळ्याचा धंदा करून तरी त्यांची पोटें भरतील. "

दुपारीं सचिवालयांत प्रेस कॉन्फरन्स भरली. त्याला सारे मंत्रि, प्रसिद्धिप्रमुख आणि २५० वार्ताहर आले होते. प्रश्नोत्तरें सर्व मराठींतून झालीं. एका वार्ताहरानें प्रश्न विचारला—सिंहगड घेतांना आपला तानाजी पडला म्हणजे सिंह पडला—यावर अनेक नाटकं सिनेमा कादंबऱ्या झाल्या आहेत. त्यांत कांहीं सत्य आहे काय ? तानाजी हें नांव ऐकतांच राजे चमकले 'तानाजी ? कोण हा तानाजी ?'

वार्ताहर म्हणाला " तानाजी म्हणजे आपला बालपणींचा मित्र. "

'छे छे–ही झूट–बनावट गोष्ट आहे—आमचे दोस्त कोणीच नव्हते. तानाजी आमचा एक शिलेदार होता. आणि ती तुमची सिंहगडची गोष्ट साफ खोटी आहे. "

" संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीबाबत आपलें काय मत आहे ? "

" संयुक्त महाराष्ट्र ? ही कसली नवी बलामत ? "

" संयुक्त महाराष्ट्र म्हणजे सर्व मराठी बोलणारे एक आणायचे. आणि त्यांचं एकच राज्य ! "

राजे यावर हंसले ते म्हणाले " अगदींच पोरकट आहांत तुम्ही. माझ्या राज्यांत कानडी मुलुख होता, तामीळ मुलुख होता, गुजराथी होता. आणि तुम्हाला वेड्यती काय आठवली."

राजांचा रोख—एकूण संयुक्त महाराष्ट्रविरोधी दिसतोय असें पाहातांच वार्ताहर, संयुक्त महाराष्ट्रवादी पुढारी चिडले—एक पुढारी निवेदन संपताच म्हणाले " आम्हाला फार आशा होती–पण शिवाजी राजे नेहरूंच्या कह्यात गेलेले दिसताहेत." लागलीच कांहीं मराठी पत्रानीं खास अंक काढून शिव्याला शिव्या—( शिवाजीला शिव्या. ) असा मथळा दिला. एकानें ' शिंच्या शिव्या चव्हाणांच्या कळपांत शिरला,' असा मथळा दिला.

शेवटीं संयुक्त महाराष्ट्र समितीतर्फे संध्याकाळच्या सभेवर हरताळ पाडावयाचें ठरलें. राजभवनावरचें आमचें सुग्रास जेवण आटपून शिवाजीराजे चौपाटीवर चव्हाणासह येतात तर काय कोणींच नाहीं. नेहमींचे भेळवालेहि शिवाजीपार्कवर गेलेले. व्यासपीठावर चव्हाण, आणि शिवाजीराजे, मागें मालोजीराव निंबाळकर आणि तपासे. असे चिंतातूर मुद्रेनें ओशाळल्यागत बसले आहेत तो एक बंद जाळीची पोलीस मोटार आली—

त्या मोटारींतून एक एक इन्स्पेक्टर आणि डॉक्टर बाहेर पडले. त्यांनीं चव्हाणांना सलाम केलं आणि म्हटलं.

" सर–एक गल्ती झालीय—काल आमच्या ठाण्याच्या मेंटल हॉस्पीटलमधला एक वेडा पळालाय. आपण शिवाजी राजे भोसले आहोंत असं त्याला वेड लागलंय आणि माफ करा हं—आपल्या शेजारीं बसलेली व्यक्ति म्हणजे आमच्या इस्पितळांतला पेशंट नं. १२ कृष्णा तात्या झपाटे. "

कृष्णा तात्या झपाटे हें नांव ऐकतांच यशवंतराव जागच्या-जागीं मूर्च्छित.

आणि वेडा शिवाजी झपाटल्यासारखा किंचाळू लागला,—पण मालोजीराव आणि तपासे यांनीं शर्थ करून त्याला खालीं पाडलें आणि त्याच्या मुसक्या बांधून त्याला मोटारींत कोंबलें आणि सारी मंडळी मुख्यप्रधानांना शुद्धीवर आणण्याची खटपट करूं लागली.

• •



दत्तू बांदेकर

मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र हें महाराष्ट्राचें एक गोड स्वप्न आहे. प्रत्येक मराठी माणसाला लागलेला तो ध्यास आहे. मराठी अंतःकरण त्यासाठीं तळमळत आहे—

हें स्वप्न, ध्यानीं मनीं नसतांना अचानक पूर्ण झालें तर ?—

# अखेर

## मुंबई बेळगांव कारवारसह

# संयुक्त महाराष्ट्र झाला !

अखेर तो सोनीयाचा दिवस उजाडला !

साडेतीन कोटी मराठी जनतेचें स्वप्न साकार झालें आणि मुंबई, बेळगांव कारवार सह संयुक्त महाराष्ट्र स्थापन झाला.

दिल्लीच्या लोकसभेनें द्विभाषिक मुंबई राज्य मोडून, संयुक्त महाराष्ट्र आणि महा-गुजरात अशी दोन भाषिक राज्यें निर्माण करण्याचा ठराव एकमतानें संमत केला आणि पुन्हां एकदां 'अदृश्य शक्ती' नें दैवी चमत्कार केल्याचें पाहून पंतप्रधान पं. नेहरूंनी समाधान व्यक्त केलें.

ही शुभ वार्ता महाराष्ट्रांत पसरली तेव्हां लोकांच्या आनंदाला पारावार उरला नाहीं. आत्यंतिक आनंदाचा तीव्र झटका बसून हजारो पुरुष बेहोष होऊन पडले, त्यामुळें गुढ्या तोरणें उभारण्याचें काम स्त्रियांनाच करावें लागलें. बेहोष पुरुषांच्या तोंडांत पेढे कोंबून त्यांना शुद्धीवर आणण्याचें काम मुलेंबाळें करीत होती. म्हातारे कोतारे फटाके उडवून आणि पिपाण्या वाजवून आनंदोत्सवांत भर घालीत.

मुंबई शहरांत तर संयुक्त महाराष्ट्राच्या महोत्सवानें धुमाकूळ घातला होता. मुंबईचा समावेश संयुक्त महाराष्ट्रांत झाल्यामुळें, मुंबईचा आनंद गगनांत मावेना ! संयुक्त महाराष्ट्र स्थापन झाल्याची बातमी प्रथम मुंबईत येऊन थडकली, तेव्हां पहिल्याच झटक्यांत समितीचे अर्धा डझन पुढारी 'हार्ट फेल' होऊन निपचित पडले. हर्षाची उकळी अनावर होऊन त्यांची हृदयक्रिया बंद पडणें स्वाभाविक होतें. पण डॉ. नरवणे ह्यांनी तातडतोब उपचार करून, त्या त्या पुढाऱ्यांची हृदयक्रिया पुन्हां सुरू केली. कांहीं पुढाऱ्यांवर अभिनंदनाचा आणि पुष्पहारांचा इतका वर्षाव झाला कीं, पुष्पवृष्टीच्या ढिगाऱ्याखालीं चेंगरलेल्या त्या पुढाऱ्यांना सुखरूप बाहेर काढण्यासाठीं आगीचे बंब बोलवावे लागले. पुढें अशा कामासाठीं एक खास शुश्रूषा पथक तयार तयार ठेवावे लागले. तिबेटला जाणाऱ्या वैद्यकीय पथकालाहि इथल्या इथेंच काम मिळालें.

संयुक्त महाराष्ट्राचें स्वागत करतांना समितीचा एक प्रवक्ता म्हणाला, "आम्ही पुढारी आपसांत जे भांडत बसतो, त्याचें सार्थक झालें. समितींतील पक्षोपपक्षांच्या दुफळीला आज गोड फळ आलें. आमच्या दुफळीमध्यें सुद्धां केवढी शिवशक्ति आहे, तें आज सिद्ध झालें. आज महाराष्ट्र द्विभाषिकाच्या जोखडांतून मुक्त झाला. आम्ही पुढारीहि फार मोठ्या जबाबदारींतून मुक्त झालो."

समितीचा दुसरा एक प्रवक्ता म्हणाला, "जगाच्या इतिहासांत गेल्या दहा हजार वर्षांत अशी अपूर्व घटना घडली नाहीं. द्विभाषिकाचा नरकासुर गाडला गेला आणि आज संयुक्त महाराष्ट्राची दिवाळी साजरी होत आहे. आज महाराष्ट्रांत घरोघरीं दीपोत्सव आणि रोषणाई चालू आहे. आज जशी दिवाळी आहे, तसा दसराहि आहे. कारण, बेळगांव, कारवार मिळवून आम्ही सीमोल्लंघनहि केलें आहे. आज जसा दसरा आहे तसा पाडवाहि आहे. कारण घरोघरीं गुढ्या तोरणें उभारून आम्ही संयुक्त महाराष्ट्राचा विजयध्वज फडकत ठेवला आहे.









अनुक्रमणिका

आज जसा पाडवा आहे, तसा शिमगाहि आहे. कारण, गांवांत द्विभाषिकवाले प्रचंड शंखनाद करीत आहेत आणि सूर्याजी पिसाळांची तोंडें शिमग्यांतल्या सोंगाप्रमाणें काळीनिळीं झालीं आहेत. आज जसा शिमगा आहे, तशी संक्रांतहि आहे. कारण, संयुक्त महाराष्ट्राच्या स्वरूपसुंदर महिला आज नेत्रदीपक वस्त्रालंकारांनीं नटून, चांदीच्या ताटांत हळदीकुंकवाचें साहित्य घेऊन मिरवीत आहेत. अशा प्रकारे दिवाळी दसरा, पाडवा, शिमगा, संक्रांत वगैरे हिंदू धर्मांतील सर्व घटक पक्षांप्रमाणें एकत्र येऊन, एकजुटीनें आजचा महोत्सव साजरा करीत आहेत. म्हणूनच मी म्हणतो कीं, जगाच्या इतिहासांत ही घटना अपूर्व आहे. "

महाराष्ट्रांत नवीन युग सुरू झाल्याची खबर आपल्या लक्षावधि वाचकांना पुरवितां पुरवितां, वर्तमानपत्रें मेटाकुटीस आलीं. पुण्यामुंबईच्या दैनिकांनीं किती जादा अंक काढले, त्याला गणतीच नाहीं. दैनिक 'मराठा' पत्रावर तर विशेष ताण पडला. तीन दिवसपर्यंत 'मराठा' एकच एक अंक छापत होता, तरी मागणी पुरी करतां येईना. 'नवाकाळ' कचेरीसमोर गिऱ्हाईकांची अशी कांहीं प्रचंड गर्दी लोटली कीं, दोन दिवस त्या भागांत रहदारी संपूर्ण बंद पडली. शेवटीं गर्दी हटविण्यासाठीं आलेले पोलिस लाठीहल्ला करून, स्वतःच अंक विकत घेण्याटीं धडपडूं लागले, तेव्हां त्या पोलीसांना हटविण्यासाठीं दुसरे जादा पोलीस मागवावे लागले.

लोकांचा उत्साह शिगेला पोंचला होता. नवमहाराष्ट्र निर्मितीच्या आनंदाप्रीत्यर्थ सरकारी कचेऱ्यांना सात दिवस, गिरण्यांना व कारखान्यांना दहा दिवस, आणि शाळांना एकवीस दिवस सुटी जाहीर झाली होती. मुंबई कॉर्पोरेशननें १०५ हुतात्म्यांच्या स्मरणार्थ १०५ दिवस सुटी घेण्याचें ठरविलें.

संयुक्त महाराष्ट्र समितीच्या आदेशाची वाट न पहातां, लोकांनी स्वयंस्फूर्त कार्यक्रम आखून पुढाऱ्यांना चकित केलें. आणि मग लोकशाहीला मान देण्यासाठीं पुढारीहि लोकांच्या कार्यक्रमांत सामील झाले. मुंबईच्या झाडू कामगारांनीं आज गटारांत नेहमीप्रमाणें डी. डी. टी. ची पावडर न टाकतां, कस्तुरी, चन्दन आणि कुंकुम यांच्या सड्यांनीं गटार सुगंधित केलें आणि मुंबई महाराष्ट्रांत आल्याची पहिली झलक दाखविली. मुंबईच्या फिल्मी नटींनीं मराठी पेहराव करून शिवाजी पार्कवर सांस्कृतिक कार्यक्रम केले आणि मराठी फुगडी घालून, मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र झाल्याची घोषणा केली. पुढाऱ्यांच्या शब्दावर मुळींच विश्वास नसलेल्या हजारो प्रेक्षकांना नटींच्या घोषणेनें समाधान झाले आणि संयुक्त महाराष्ट्र खरोखर झाल्याची मनोमन खात्री त्यांना पटली. हिंदुराज्य पक्षाच्या वतीनें गिरगांवच्या नाक्यावरच सहस्र भोजनाची विशाल पंगत लागली आणि मुंबईवर महाराष्ट्राचा संपूर्ण हक्क असल्याचे भर, रस्त्यांत लाडू खाऊन भोजन भाऊंनी सिद्ध केलें !

संयुक्त महाष्ट्राच्या जयजयकारानें सारें वातावरण दुमदुमून गेलें. छोट्या मोठ्या मिरवणुकींनी रस्ते गजबजले. फटाके, दारूकाम, मेजवान्या, रोषणाई यांची एकच धमाल झाली. सनई आणि चौघडे अखंड झडत राहिले. मंगल वाद्यांच्या गजरांनी कानाचे पडदे फाटले. मुंबईच्या अफाट वस्तीला शहरांतील वाजंत्री अपुरे पडले. ढोल आणि नगारे यांचा तुटवडा भासला. तेव्हां लोक वाटेल तें वाजवूं लागले. भांडीकुंडी, घासलेटचे डबे, कागदी पिपाण्या इत्यादींचा स्वैर उपयोग झाला. काय वाजवावे आणि काय नाहीं, याला मर्यादाच उरली नाहीं. शेवटी चक्का आपले तोंडच वाजवूं लागल्या ! तेव्हां समितीनें केंद्र सरकारकडे मदतीची याचना केली. आणि मग दिल्ली, कलकत्ता, मद्रास वगैरे भागांतून विमानानें मुंबईत वाजंत्र्यांचा पुरवठा होऊं लागला. अमेरिकेनें आणि रशियानेहि वादन साहित्यांनीं भरलेली एक एक बोट संयुक्त महाराष्ट्राला देणगी म्हणून पाठविली.

संयुक्त महाराष्ट्र झाल्यानें कळताच ठिकठिकाणीं अपूर्व चमत्कार होऊं लागले. आरे गौळीवाड्यांतल्या म्हशी दुप्पट दूध देऊं लागल्या. मुंबईतील व्हिक्टोरियाचे घोडे जमिनीला पाय न लावतां, दुप्पट जोरानें धांवूं लागले. मुंबईच्या कावळ्यांना कोकिळेचा कंठ फुटला आणि कोकिळांना लता मंगेशकराची स्वर माधुरी आली. महाराष्ट्रांतल्या कोंबड्या सोन्याचीं अंडीं घालूं लागल्या आणि शेतांत जोंधळ्याला मोत्यांची कणसें आलीं. सह्याद्रीचे दगड आणि धोंडे काव्य गायन करूं लागले आणि मराठी भाषेचा विकास दगडधोंडा करूं लागला. हा संयुक्त महाराष्ट्राचा तात्काळ परिणाम दिसून आला. कोयनेची वीज मुदतीच्या अगोदरच खेड्यापाड्यांत खेळूं लागली. संयुक्त महाराष्ट्राच्या दीपोत्सवासाठीं कोयनेची वीज मिळालेली पाहून महाराष्ट्रांतील ग्रामीण जनतेला आनंद झाला.

मुंबईच्या बाजारांत कमालीची स्वस्ताई दिसत होती. घेलाशेटजींच्या डोक्याएवढा नारळ दोन आण्याला आणि गालाएवढे टामेटो एक आणा रत्तल मिळत होते. गांवांत साखर मोफत वाटण्यांत येत असल्यामुळें ती विकत घेण्याचा प्रश्नच नव्हता. मुंबईतील गुजराती व्यापाऱ्यांनी आपल्या दुकानावर 'आज उधार, उद्यां रोख' अशा पाट्या लावल्या होत्या. एकहि दुकानदार रोख पैसे घेऊन माल देण्यास तयार होईना. संयुक्त महाराष्ट्रासाठीं उधारींतच व्यवहार करण्याचा सर्व व्यापाऱ्यांनी आग्रहच धरला. त्यामुळें 'मराठी-गुजराती भाई भाई' अशा घोषणा बाजारांत निनादूं लागल्या.

समितीचे एक श्रेष्ठ पुढारी श्री. एस्. एम्. जोशी हे अगदींच गोंधळून गेले होते. खरोखर संयुक्त महाराष्ट्र झाला काय ? हें स्वप्न आहे कीं सत्य आहे ? आपण झोपेंत आहोत कीं

## गाथा सप्तशती

पाणपोईवर पाणी घालणारी स्त्री पथिकाच्या ओंजळींत पाणी ओतीत आहे. त्यानें तिच्यावर नजर रोखली आहे. ओंजळीचीं बोटें तो विरळ करीत आहे व पाण्याची धार ती अधिकाधिक बारीक करीत आहे !



बाता सप्तशती १९५९

अनुक्रमणिका

जागृतवस्थेंत ? त्यांना कांहींच उलगडा होईना ! शेवटीं शहानिशा करून घेण्यासाठीं ते भाई डांगे ह्यांच्याकडे गेले. श्री. डांगे हेहि अशाच मूढावस्थेंत होते. आपण स्वप्नांत तर नाहीं ना, अशी शंका त्यांनाहि होती. संयुक्त महाराष्ट्रासाठीं अंतिम लढा अजून व्हाव-याचाच आहे. मग त्यापूर्वींच हा चमत्कार घडला कसा ?

श्री. एस्. एम्. म्हणाले, " मित्रशिरोमणी डांगे, हे सगळं खरं ना ? माझा या प्रकारावर विश्वासच बसत नाहीं. तुम्ही मला एक सणसणीत चिमटा काढा बघूं ! मी स्वप्नांत नाहीं याची मला खात्री करून घेतली पाहिजे."

श्री. डांगे म्हणाले, " मित्रा, साथीकुल-भूषणा, माझीहि अवस्था तुमच्या सारखीच झाली आहे. संयुक्त महाराष्ट्र खरोखर मिळाला काय, याबद्दल मी मॉस्कोकडे विचारणा केली आहे. पण अजून उत्तर आले नाहीं. मी मोठ्या बुचकळ्यांत पडलो आहे. तुम्ही माझा एक सडकून चिमटा घ्या ! मी स्वप्नांत नाहीं याची मलाहि खात्री करून घेतली पाहिजे. "

नंतर डांगे आणि जोशी हे दोघेहि एकमेकांना चिमटे घेऊं लागले ! समितीचे दोन महान् नेते परस्परांचे चिमटे घेत आहेत, ही बातमी शहरांत पसरली आणि हजारो लोक त्या ठिकाणीं धांवून आले !

लोक म्हणाले, "अहो मान्यवर पुढाऱ्यांनो, हा काय चावटपणा तुम्ही चालविला आहे ? संयुक्त महाराष्ट्र प्राप्त झाला तरी तुम्ही एकमेकांचे चिमटे घेतां, याचा अर्थ काय ! आतां कृपा करून आपसांतील भांडणें बंद करा आणि मंत्रिमंडळ बनविण्याच्या विधायक कार्याला लागा. आपल्याला यापुढें समाज-वादी महाराष्ट्र घडवायचा आहे याची तुम्हांला आठवण आहे ना ! "

जनतेचा बराच गैरसमज झाल्याचे पाहून डांगे म्हणाले,

" मुंबईच्या शूर नागरिकांनो, तुम्ही मुळींच काळजी करूं नका. समितींतील घटक पक्षांमध्यें मुळींच दुफळी नाहीं. आम्हीं वर वर एकमेकाचे चिमटे घेत असलो, तरी आंतून आमची एकजूट अभंग आहे. जा, तुम्हीं आपला महोत्सव दणक्यानें चालू ठेवा. बोला, छत्रपती शिवाजी महाराज कीं जय ! "

लोकांनी शिवाजी महाराजांचा जयजयकार केला. डांगे आणि जोशी यांचा जयजयकार केला. आणि शेवटीं नेहमीच्या पद्धतीनें ' मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र झालाच पाहिजे ' अशी प्रचंड आरोळी ठोकली. पण लगेच त्यांना आपली चूक कळून आली. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र आतां झाला असल्यामुळें, पुन्हां ' झालाच पाहिजे ' असे ओरडण्यांत अर्थ काय ? तीं घोषणा आतां ' टाईमबार ' झाली होती ! आतां दुसरी नवीन घोषणा हवी. नवीन घोषणा काय ओरडावी, याचा सल्ला घेण्यासाठीं लोकांच्या झुंडीच्या झुंडी आचार्य अत्रे यांच्या शोधार्थ निघाली.

आचार्यांचा पत्ताच नव्हता. ते घरीं नव्हते, दारीं नव्हते, कचेरींत नव्हते आणि मोटारींतहि नव्हते. मग ते गेले कुठें ? ह्या धामधुमींत त्यांचें काय झालें असावें ?

दोन दिवसानंतर आचार्य अत्रे पुणें येथें शनिवार वाड्यांत प्रकट झाले. ह्यासंबंधीं वर्तमानपत्रांत पुढील खुलासा प्रसिद्ध झाला.

### आचार्य अत्रे ह्यांची मंगळावर स्वारी

संयुक्त महाराष्ट्र स्थापन झाल्याची शुभ वार्ता दोन दिवसांपूर्वीं आचार्य अत्रे ह्यांना मुंबईंत त्यांच्या निवासस्थानीं कळली. त्याबरोबर आत्यंतिक आनंदाच्या आवेगांत बसल्या जागेवरून त्यांनीं उंच उडी मारली. ती प्रचंड उडी दहा हजार फूट वर गेली. सुदैवानें याच वेळीं रशियाचा एक कृत्रिम उपग्रह अंतराळांत फिरत होता. आचार्यांनी त्या उपग्रहाचा आधार घेतला आणि त्याच्या मदतीनें ते मंगळावर जाऊन पोंचले. आचार्यांना अक्षरशः स्वर्ग दोन बोटें उरले. अस्मान ठेंगणें झाले. संयुक्त महाराष्ट्र निर्माण झाल्याची पहिली बातमी आचार्यांनी मंगळावरील जनतेला दिली. तेथील लोकांनी आचार्यांचा प्रचंड सत्कार केला. जनता आघाडीची एक शाखाहि मंग-ळावर खोलण्यांत आली. तेथून आचार्य-खास विमानानें चंद्रलोकावर गेले. त्या ठिकाणीं नरराक्षस मोरारजींनें बळि घेतलेले १०५ हुतात्मे आचार्यांना भेटले. आचा-र्यांनीं कृतज्ञतापूर्वक हुतात्म्यांना अभि-वादन करून, संयुक्त महाराष्ट्राची मंगल वार्ता त्यांना कथन केली. आपलें बलिदान वाया गेलें नाहीं, याबद्दल हुतात्म्यांनी समा-धान व्यक्त करून, संयुक्त महाराष्ट्राला आशिर्वाद दिला. जनता आघाडीची दुसरी शाखा चंद्रलोकांवर स्थापन करून आचार्य अत्रे यांनी सर्वांचा निरोप घेतला आणि दुसऱ्या एका ' स्पुटनिक ' मध्यें त्यांनी उडी घेतली. आचार्यांच्या प्रचंड वजनानें तें ' स्पुटनिक ' अंतराळांतून खालीं आले आणि अखेर पुण्यांत शनिवार वाड्यार कोसळले !

(पान ७० वरून) ● ●

## भांडवल परदेशी—माल देशी

युवराज हें श्री. बाळ सामंत यांचें पहिलेंच नाटक. या नाटकाची मध्यवर्ति कल्पना परकीय असली तरी त्याचें वळण सर्वस्वी स्वतंत्र वाटतें.

एका टॅक्सी ड्रायव्हरनें तोतया युवराजाची भूमिका घेऊन एका श्रीमंत कुटुंबांत कसा गोंधळ अडवून दिला आणि शेवटीं हा युवराज तोतया नसून खराखुरा असतो हें सिद्ध होतें असे या नाटकाचें थोडक्यांत कथानक आहे. श्री. सामंत यांचें संवाद चटकदार आणि खुसखुशीत आहेत. आणि युवराजाचें रहस्य शेवटपर्यंत खेळवत ठेवण्यांत आणि वाचकाची उत्कंठा कायम ठेवण्यांत त्यांनीं यश मिळविलें आहे. कांहीं ठिकाणीं संवादांत थोडा पाल्हाळ असल्यामुळें तरी क्वचित ठिकाणीं रसहानि होते. तरीपण शाळा कॉलेजच्या संमेलन प्रसंगीं करण्यासाठीं या नाटकाचा उपयोग व्हावा. मात्र यापुढें परदेशी भांडवलाचा देशी दुकान-दारी करण्याचा हव्यास सोडून सामंतांनीं स्वतंत्र नाटकें लिहिण्याचें साहस करण्यास हरकत नाहीं.

—मधु कर्णिक

हें मासिक श्री. दीनानाथ दलाल यांनीं न्यू भारत प्रिंटिंग प्रेस, ६, केळेवाडी, गिरगांव, मुंबई ४ येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ, ४०/४२ केनेडी ब्रिज येथें प्रकाशित केलें,




## महाराष्ट्राच्या महापुरुषाला अभिवादन !

> जयोस्तुते ते महन्मंगले शिवास्पदे शुभ दे ।
> स्वतंत्रते भंगवते त्वांम्यहम् यशोयुतां वंदे ॥

शिवरायानंतर महाराष्ट्राच्या हृदय-सिंहासनावर कायमचें अधिष्ठित होण्याचा मान मिळविला लोकमान्य बाळ गंगाधर टिळकांनींच !

१९२० पूर्वींच्या भारताच्या राजकीय जीवनांत नवें चैतन्य आणि स्फूर्ति निर्माण करण्याचें महान् कार्य भारताच्या या सुपुत्रानें अव्याहत केलें. एखाद्या अनिभिषिक्त राजर्षीप्रमाणें लोकमान्यांनीं भारतीय जनमनावर सतत अधिराज्य केलें. लोकमान्यांचा पिंड मराठी माणसाचा. त्यामुळें झुंज हा त्यांच्या आयुष्याचा स्थायीभाव ! त्यांचें चरित्र म्हणजे परकी राजवटीशीं केलेल्या प्रखर संघर्षाचा तेजःपुंज इतिहास !

—पण राजकीय कर्तृत्वाप्रमाणें त्यांचें विद्वत्त्वहि तितकेंच विशाल आणि उत्तुंग होतें. त्यांचें गीतारहस्य आणि इतर ग्रंथ म्हणजे अभिजात भारतीय विद्वत्तेचा खराखुरा आविष्कार !

असा लोकोत्तर महापुरुष शतकांतून एकदांच निर्माण होतो. सामान्यांनीं, त्यांच्या पावलांचा मागोवा घ्यायचा, आणि राष्ट्राच्या भावी पिढीनें असा ज्वलंत आणि अमोल वारसा घेऊनच पुढचें पाऊल टाकायचें.

आज या ऑगस्ट महिन्यांत—स्वातंत्र्य-मासांत प्रत्येक भारतीयानें या महापुरुषाचें कृतज्ञतापूर्वक पुण्यस्मरण केले पाहिजे.

दीपावलीचा हा अभिनव महाराष्ट्र विशेषांक म्हणजे लोकमान्यांना वाहिलेली भावपुष्पांजलि !

## पंधरा ऑगस्ट

याच मंगल दिवशीं बरोबर बारा वर्षांपूर्वी गेलीं दिडशें वर्षें मनाशीं बाळगलेलें स्वातंत्र्याचें दिव्य स्वप्न साकार झालें. या एकाच ध्येयासाठीं क्रांतिकारकांना आत्मयज्ञ करावा लागला, देशधुरीणांना खडतर तुरुंगवास पत्करावा लागला आणि हजारों भारतीयांनां संघर्षात्मक चळवळीच्या निमित्तानें आपल्या प्राणांचे बलिदान करावें लागलें.

या सर्व हुतात्म्यांच्या पवित्र स्मृतीला आमचें शतशः प्रणाम !

स्वातंत्र्य आलं कीं देशाचा एकदम जादूची कांडी फिरविल्याप्रमाणें कायापालट होणार अशी भोळ्याभाबड्या जनतेची समजूत. पण आज बारा वर्षें उलटूनहि कायापालट दिसलेला नाहीं. पारतंत्र्याच्या दुःखापेक्षां स्वातंत्र्याचें हें सुख किती कष्टदायक आणि जबाबदारीचें आहे याची जाणीव हळू हळू होऊं लागली. १५ ऑगस्टच्या बेहोषीनंतर फाळणीचा अपरिहार्य परिणाम म्हणून देशांत उत्तरेकडे निरपराधी जीवांच्या रक्ताचे पाट वाहिले गेले. त्या मागोमाग निर्वासितांच्या पुनर्वस्तीचा बिकट प्रश्न राष्ट्रासमोर आला. संस्थानांचें विलिनीकरण, काश्मीर आणि गोवा, वाढती बेकारी, पाकिस्तानच्या सरहद्दीवरील आणि पाण्याच्या प्रश्नावरच्या कटकटी, भाषिक राज्याच्या प्रश्नावरून निर्माण झालेली तेढ, केरळचें आंदोलन अशा एकामागून एक अनेक समस्या निर्माण झाल्या. त्यांतील कांहीं सोडविल्या गेल्या तर कांहीं अजूनहि रेंगाळत आहेत.

पण अशा खडतर कालखंडांतहि आम्हीं इतर आघाड्यांवर अभिमानास्पद असें कार्य केलें. पहिली सार्वत्रिक निवडणूक हा जागतिक इतिहासांतील लोकशाहीचा एक महान् प्रयोग. त्यानंतर घटनासमिती आणि तिच्या हातून तयार झालेली भारताची लोकशाहीप्रधान राज्य-घटना. त्यानंतर नियोजनाच्या दृष्टीनें पहिली पंचवार्षिक योजना आंखून भारतानें प्रगतीच्या दिशेनें टाकलेले पहिलें धाडसी पाऊल. पहिली योजना पूर्ण झाली आणि आतां दुसरी पूर्ण होण्याच्या मार्गावर आहे. १९६१ च्या आंत प्रत्येक राज्याच्या तालुक्यांत राष्ट्रीयविस्तार संघटनांचें जाळेंच निर्माण होणार आहे. सिंद्री येथील खताचा कारखाना, तुंगभद्रा, हिराकूड, भाक्रा नांगल, कोयना आदि महाप्रचंड धरणें, सरकेला, भिलाई येथी अजस्र पोलाद कारखाने, चित्तरंजन येथील इंजिनें तयार करण्याचा कारखाना, तर विजगापट्टम येथील बोटी बांधण्याचा कारखाना, तसेंच नॅशनल केमिकल लॅबोरेटरी, खडकवासल्याची महान् राष्ट्रीय सैनिक शाळा आणि तुर्भे येथील अणुशक्ति संशोधन प्रयोग शाळा——म्हणजे नवभारताचीं कायमचीं अभिमान स्थानें !

पण या प्रगतीबरोबर सामान्य जनांच्या दैनंदिन जीवनांत सुखाचे क्षण कितपत निर्माण झाले आहेत याचा विचार करतां अजून तरी परिस्थिती आशादायक नाहीं असें दिसतें. दिवसेंदिवस महागाई वाढते आहे. मुंबईसारख्या

शहरांत रोजच्या वाहातुकीचा आणि राहाण्याच्या जागेचा प्रश्न अत्यंत तीव्र होत आहे. बेकारीचा राक्षस तर मानगुटीला बसलाच आहे आणि अशा परिस्थितीत तिसरी पंचवार्षिक योजना यशस्वी करावयाची असल्यास जनतेनें अधिक त्यागाची तयारी ठेवावी असा आदेश पुढारी देत आहेत.

—जनता असा त्याग करायला नेहमींच तयार असते; नव्हे नाईलाजानें हा त्याग सक्तीचाहि ठरतो. पण राज्ययंत्रणेतील लांच-लुचपत, ढाढती वशिलेबाजी, मुंदडा प्रकरणासारखीं अप्रकाशित प्रकरणें—!

या महिन्यांत स्वातंत्र्याचें दुसरें आशादायक-पर्व सुरू होत आहे. आपण आशा करूंया कीं, 'हेहि दिवस जातील'!

• • •




आशादायक गोष्टी

—र. दा. स.

भांडवल परदेशी
माल देशी

—मधु कर्णिक

## रंगीत तालीम

"हें सारं टिकेल ना ?"

दीपावलीचा पहिला अंक वाचून संपविल्या-वर कांहीं चोखंदळ वाचक उद्‍गारले.

"हें सारं टिकेल ना ?—नाहीं कसं ? टिकलंच पाहिजे !—नव्हे टिकवलंच पाहिजे आपल्याला" आमचे साहाय्यक लेखक आणि हितचिंतक म्हणाले.

खरं सांगायचं म्हणजे कांहीं चोखंदळ वाचकांच्या मनांत असलेली भीति आम्हालाहि वाटत होती. कारण मराठी माणसाचं वैशिष्ट्य म्हणा—अवगुण म्हणा—काय वाटेल तें म्हणा—मराठी माणूस म्हणजे आरंभशूर. त्यामुळें आमची आम्हालाच खात्री नव्हती, शाश्वती नव्हती.

पण दीपावलीचं भाग्य असं थोर, पुण्याई म्हणा हवी तर, दीपावलीनं आपलं वैशिष्ट्य टिकवलं—नव्हे वाढवलं.

—आणि त्यामुळें आणखी हा खास अंक कशाला असे विचार मनांत येत. कारण तसं पाहिलं तर दीपावलीचा प्रत्येक अंक हा खास अंक असा तर सान्या वाचकांचा कौल !

त्यामुळें दीपावलीवर आणखी एक जबाब-दारी येऊन पडली. खास अंक हा नाममात्र खास अंक असतां कामां नये. उलट वार्षि-काच्या बाबतींत दीपावलीनें जें वैशिष्ट्य राखलें, जें वैशिष्ट निर्माण केलें आणि मराठी दिवाळी अंकांना एक लालित्यपूर्ण प्रतिष्ठा मिळवून दिली—तेंच वैशिष्ट्य आणि वैविध्य खास अंकांतहि आलेंच पाहिजे.

आज दिवाळी अंकांच्या इतरत्र जाहिराती चमकूं लागल्या आहेत. अशा वेळीं आपण आपली जाहिरात करण्याच्या अगोदर—आपल्या दिवाळी अंकाचें एकूण स्वरूप कसें काय होणार हें अजमावून नको का पाहायला ?

आणि हा अभिनव महाराष्ट्र खास अंक—म्हणजे गेलीं पंधरा वर्षे मराठी दिवाळी अंकांच्या सतत अग्रभागीं असणाऱ्या दीपावलीच्या आगामी भरघोस दिवाळी अंकाची छोटी रंगीत तालीमच ! रंगीत तालीम म्हणजे पूर्ण नाटक नव्हे—नाटकाची छोटी चुणुकच !

यामुळें या अभिनव महाराष्ट्र अंकांत अनेक उणीवा आहेत याची आम्हाला जाणीव आहे. तथापि या उणीवा असूनहि दीपावलीनें आपलें नेहमीचें वैशिष्ट्य राखले आहे असें दिसेल.

दीपावलीवर सतत प्रेम करणारे लेखक हितचिंतक, जाहिरातदार, ब्लॉकमेकर्स यांनीं या खास अंकाच्या तयारीबाबत जें साहाय्य केलें त्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत ऋणी !

## आशादायक गोष्टी

### 'वास्तु'

प्रा. वसंत वऱ्हाडपांडे यांचा हा पहिला कथासंग्रह आणि पहिलेंच मुखपृष्ट. पहिले-पणाची जाणीव ठेवूनच या संग्रहाकडे पहाणें उचित ठरेल.

'वास्तु' मधील कांहीं कथा चांगल्या आहेत व कांहीं अविकसित लेखणींतून उतर-लेल्या दिसतात. कांहीं कथा जुन्या पद्धतीच्या आहेत तर कांहीं नव्या धर्तीच्या आहेत. कथा-प्रधान कथेकडून मानसप्रधान कथेकडे लेख-काचा झालेला प्रवास यांत दिसतो. तथापि अजून त्यांचें वळण निश्चित झालें नाहीं. 'वास्तु' या कथेंत ढासळत चाललेल्या जुन्या संस्कृतीचें प्रतीक लेखकानें कळकळीनें चिता-रलें आहे. मला ही कथा चांगली वाटली; पण कांहींशी अपुरी वाटली. तर निळ्या डोळ्यांची कथा कांहींशी अतिरंजित व असंभवनीय (त्यांतला शेवटचा प्रसंग) वाटली. वातचक्र, पिंजरा व मधला दुवा या कथा परंपरागत विषयावरील आहेत. किमया ही चटकदार कथा असली तरी ती सांगण्यांत आणखी खुमासदारपणा असता तर ती अधिक रंजक झाली असती. कारण या कथेंत अशा खुमास-दारपणाला वाव होता. चाक आणि शिकंदर या कथा नव्या धाटणीच्या आहेत. वाचनीय आहेत. त्यांतल्या त्यांत शिकंदर. 'दुबळा' ही कथा नसून कांहींसे आत्मनिवेदन किंवा स्वगत आहे. समाजांतील व्यापक दुःखाचे व्यक्तिगत मनावर होणारे परिणाम चित्रित करण्याचा हा प्रयत्न क्लिष्ट झाला आहे. या कथेचा पहिला भाग तर फारच गूढ आणि वाचकाच्या कल्पना शक्तीला ताण देणारा आहे. त्यामुळें कंटाळवाणा वाटतो. शृंखला या कथेत लेखकानें देह आणि आत्मा यांच्या-मधील परंपरागत संबंधांचे विश्लेषण करण्याच प्रयत्न केला आहे. परंतु विषय जुना आणि कल्पनाही रूढ, त्यामुळें या कथेचें नाविन्य हरपलें आहे.

लेखकाची भाषाही पूर्णपणें विकसित झाल्याचा प्रत्यय येत नाहीं. संस्कृतप्रचुर शब्दांचा मोह अनावर. त्यामुळें भाषा अनेक ठिकाणीं अगडबंब वाटते.

तथापि एकंदर कथासंग्रह आशेला जागा देणारा आहे. त्यांचा यापुढील कथासंग्रह अधिक नेटका आणि बांधेसूद निघेल अशी अपेक्षा करण्याइतके गुण यात आहेत.

(पान ६८ वर) —र. दा. स.






Dipavali Monthly August 1959

REGD. NO. B-7640



भारतीय शतक

# भारतीय निर्मित किर्लोस्कर एंजिन घेण्यामुळेंच मला मनःशांती लाभली !

— श्री. सुरवसे



अकोले (काटी)
ता. १२-३-५९

मे. किर्लोस्कर ऑईल एंजिन्स, लि.
पुणें ३

सप्रेम नमस्कार,

मी आपले सोलापूर येथील एजंट मे. मुरलीधर मारुती आपिसमस पांचेकइन किर्लोस्कर सेरीज १ चे एंजीन पंपासह ता. २४-६-४९ ला रोख खरेदी घेतलें. एंजीन घेतेवेळेस इतरांनी देशी एंजिन न घेता परदेशी आडवें एंजिन घ्या म्हणून सांगत असतांना त्याकडे दुर्लक्ष करून आपलेच उभें एंजीन खरेदी केलें. व तो पंपसेट आजतागायत बेतांशेत चालू आहे.

एंजिन घेऊन जवळ जवळ १० वर्षे होत आली. १० वर्षांत सदर एंजिन ३ वेळा संपूर्ण ओव्हरहॉल करून घेतलें; परंतु त्याचा खर्च एक मोटेपेक्षाहीं कमी आला.

सदर एंजिनवर १२ एकर बागायत असून दरवर्षी त्यामध्यें ६ हजार रुपयांचें उत्पन्न येतें. सदर एंजिन घेतलेपासून आपल्या एजंटानी वेळोवेळी एंजिनची पाहणी करून मोफत सल्ला दिला आहे. माझे एंजिन नफ्यांत असून माझी कसल्याही प्रकारची तक्रार नाही.

सर्व शेतकऱ्यांनी माझ्याप्रमाणेंच एंजिनची निवड करावी, अशी मी आग्रहानें शिफारस करतो.

कळावे, लोभ असावा ही विनंती,

आपला

किर्लोस्कर एंजिनांची गरज
किर्लोस्कर एंजिनेंच
भरून काढतात !



किर्लोस्कर ऑईल एंजिन्स लि., खडकी, पुणें ३

COVER PRINTED BY: SADHANA ART PRINTERS, BOMBAY-5 TOM & BAY